
ज्योतिष्य म्हणजे भविष्याचे अचुक निदान नव्हे,
तर पुढील वाटचालीसाठी अचूक व उपयुक्त मार्गदर्शन .
जीवनमार्गदर्शन
कम्प्युटर आज्ञाप्रणालीच्या सहाय्याने घेतलेला
ज्योतिष्यशास्त्राचा विज्ञाननिष्ठ मागोवा
डॉ.दादा गाडेकर
विजय म्हैसकर

प्राचीन शास्त्राचे
विज्ञान पद्धतीने आणि विज्ञान आधारित
संशोधन

# ‘जीवनमार्गदर्शन’

Scientific Research
of
Ancient (Hora) Shastra

## JEEVANMARGDARSHAN

लेखक - डॉ. भा. शं. तथा दादा गाडेकर, पी. एच. डी.

लेखनसहाय्य - विजय रा. म्हैसकर, M.E.

वर्ष २०१५

प्रकाशक : ई साहित्य प्रतिष्टान
www.esahity.com

जीवनमार्गदर्शन (Jeevanmargdarshan)

लेखक **डॉ. भाऊसाहेब शंकर** तथा **दादा गाडेकर** Ph.D
Mobile 8796162691 / 9423033619 Email : bs_gadekar@rediffmail.com
लेखन सहायक **श्री. विजय रा. म्हैसकर** M.E.
Mobile 9867399870 Email : vijay249@hotmail.com



प्रकाशक ई साहित्य प्रतिष्ठान

www.esahity.com
esahity@gmail.com


* विनामूल्य वितरणासाठी उपलब्ध.
* आपले वाचन झाल्यावर आपण हे फॉरवर्ड करू शकता.
* हे ई पुस्तक वेबसाईटवर ठेवण्यापूर्वी किंवा वाचनाव्यतिरिक्त कोणताही वापर करण्यापूर्वी ई साहित्य प्रतिष्ठानची पूर्व परवानगी घेणे आवश्यक आहे.

# या विषयाबद्दल थोडेसे

ई साहित्य प्रतिष्ठान

ज्योतिष, धर्म, अस्तिकता हे विषय आपल्याकडे नेहमीच चर्चेला येतात. विशेषतः ज्योतिष या विषयाबद्दल लोक जाता येता बोलतात. बहुतांश लोक ज्योतिषावर किंवा पत्रिकेवर आपला विश्वास नाही असे म्हणतात. आणि तरीही वर्तमान पत्रातील राशीभविष्य पहातात. कुंडली करवून घेतात, लग्नाच्या वेळी पत्रिका बघून त्यानुसार लग्न ठरवितात. मुहूर्त तर ठरवितातच. सगळे टिव्ही न्यूज चॅनेल (दूरदर्शन वगळता) राशीभविष्याचा अर्धा तास ठेवतात. पुरोगामी म्हणवून घेणारी वर्तमानपत्रं मराठी साहित्यावर नियमित सदर ठेवत नाहीत पण राशीभविष्यावर मात्र ठेवतात. याचं कारण लोक ते वाचतात. ''माझा विश्वास नाही, हे सगळं बंडल असतं'' असे म्हणत म्हणत वाचतात. ठामपणे अजिबात विश्वास नसणारे काही एक दोन-पाच टक्के लोक सोडले तर बहुतांश लोकांची हीच अवस्था असते.

अशा वेळी आम्हाला वाटते की एकदा यावर चर्चा होऊनच जावी. हे शास्त्र आहे का? की थोतांड आहे? याची गॅरंटी काय? याचा कोणी गंभीर अभ्यास करते का? त्यातून काय निष्पंन्न होते?

आज जीवनमार्गदर्शन हे पुस्तक प्रकाशन करण्यामागे आमचा हाच हेतु आहे. हे पुस्तक सर्वांनी वाचावे. पूर्वग्रह बाजूला ठेवून हे पुस्तक वाचावे. यातील मते मान्य होवोत वा न होवोत, पण त्यावर आपली मते स्पष्ट मांडावीत. अशा प्रकारचा अभ्यास (लेखकांनी ३५००० लोकांचा अभ्यास केला आहे) केलेले इतर कोणी असतील तर त्यांनी त्यावर लिहावे. ज्योतिष हा विषय तद्दन खोटा आहे असे मानणाऱ्या व मांडणाऱ्यांनी तो मुद्देसूदपणे लिहावे व आमच्याकडे पाठवावे. अभ्यासपूर्व लिखाणासाठी ई साहित्य प्रतिष्ठान कायमची प्रोत्साहनाची भूमिका घेते.
धन्यवाद.

सुनील सामंत
टीप ई साहित्य

esahity@gmail.com

# मनोगत

या पुस्तिकेतून **विज्ञानपद्धतीने** केलेल्या ज्योतिषशास्त्राच्या माझ्या १९६५ पासूनच्या संशोधनाचे काहीसे आश्चर्यकारक, पण **विज्ञानाधिष्ठित आणि साधार निष्कर्ष** मी, डॉ, दादा गाडेकर आपणापुढे ठेवत आहे. कृपया आपण खुल्या मनाने संपूर्ण वाचून आपले मत बनवावे, जरूर तर आमच्याशी चर्चा करावी. आम्ही स्वागतच करू. कारण आंधळा विरोध किंवा आंधळी श्रद्धा दोन्हीही चुकीचेच, ते डोळस पाहिजेत.

भविष्यात काय होईल त्या बद्दल कुतूहल, आणि ते जाणून घेण्याची प्रबळ इच्छा मानवाला फार पूर्वीपासूनच आहे. भविष्य वर्तवण्याच्या वेगवेगळ्या पध्दती जगभर सर्वत्र दिसून येतात हा त्या प्रबळतेला पुरावाच आहे. आकाशातील ग्रहस्थितीवरून भविष्य वर्तवण्याची पध्दती भारतात प्राचीन काळापासून असल्याचे आढळते. येथून हे शास्त्र नंतर इतर देशातही गेले. 'या शास्त्रातून अचूक भविष्य कळते' असा दृढ समज समाजात आणि ज्योतिष वर्गात फार पूर्वीपासून आहे. आणि सामान्यांकडून या शास्त्राची हीच अपेक्षा केली जाते. वास्तव मात्र असे आहे की काहीजणांची थोडीच भाकिते खरी ठरतात मात्र अनेकांची फार मोठ्या प्रमाणात चुकलेलीच आढळतात.

मला लहानपणापासूनच काही तरी संशोधन करावे असे वाटत असे. माझे सद्गुरू बाबामहाराज आर्वीकर यांच्या प्रेरणेने मी, दादा गाडेकर, १९६५ पासून या शास्त्राचे संशोधन आणि त्याबरोबरच विज्ञान आणि अध्यात्म याचाही अभ्यास करत राहिलो आहे. 'हे खरेच शास्त्र आहे का' हे शोधण्याचा माझा हेतु होता आणि ते विज्ञानपद्धतीने सिद्ध झाले तरच त्याचा सध्याच्या युगामध्ये स्वीकारले जाईल असे मला सूचित करण्यात आले होते. सुरुवातीपासून या प्राचीन शास्त्राचे संशोधन विज्ञान पद्धतीने करण्याची दिशा मी ठेवली होती. गेल्या काही दशकापासून कॉम्प्युटर उपलब्ध झाल्यामुळे मला हे संशोधन करून विज्ञानमान्य तर्हेने थोरांच्या आशिर्वादाने निष्कर्ष काढणे शक्य झाले, अन्यथा शक्य नव्हते. याबद्दल अधिक सविस्तर पुढे पाहू.

या छोट्याशा पुस्तकामध्ये ज्योतिषशास्त्राचे माझे संशोधन, या संशोधनाची व्याप्ती आणि तपशील, त्यातून निघालेले निष्कर्ष हे थोडक्यात दिले आहे. या संशोधनानुसार हे सिद्ध झाले आहे की-''या शास्त्रातून अचूक भविष्य कळू शकत नाही, ते अशक्य आहे. परंतु अचूक आणि उपयुक्त मार्गदर्शन नक्की मिळते.'' हे प्रचलित विचारसरणीला कलाटणी, धक्का देणारे आहे. हे विज्ञान छाननीने कसे सिध्द झाले आहे इत्यादि थोडक्यात मांडले आहे. संशोधनासाठी मी १९६४ ते १९९४ या ३० वर्षात वयाने ४० वर्षा वरील सुमारे ३५००० व्यक्तींच्या जन्म तारीख - वेळ - गाव, या शिवाय त्यांच्या जीवनांत घडलेल्या घटनांचा तारीखवार तपशील संग्रहित केला. कॉम्प्युटरच्या वापराशिवाय मला हे संशोधन करणे अशक्य होते. प्राचीन काळातील शास्त्रनियमांची सध्याच्या काळात असलेली अचूकतेची टक्केवारी गणिती पध्दतीने मला कॉम्प्युटरच्या सहायाने वापरण्यासाठी गणितबध्द करायची होती ती केली. त्यातूनच अखेर 'ग्राफिक' ही संगणकीय आज्ञाप्रणाली तयार झाली.

संशोधनात अध्यात्म आणि विज्ञान याचे अनुसंधान प्रथमपासूनच ठेवले होते. एक महत्वाचे वास्तव मी येथे मुद्दाम नमूद करतो. Wikipedia वर जगाची लोकसंख्या आणि दरवर्षी दर हजारी सरासरी मानव जन्माचे प्रमाण या विषयी अनेक वर्षाची आकडेवारी उपलब्ध आहे. त्यावरून जगात दर दिवशी सरासरी २२८००० बालकांचा जन्म होत आहे हे स्पष्ट होते. म्हणजे दर दिवशी १२ पैकी प्रत्येक लग्न राशीवर १९००० बालकांचा जन्म होत असतो. प्राचीन पध्दतीने केवळ डोळ्याने दिसणाऱ्या ग्रहरचने नुसार १९००० समान ग्रहमान असलेल्या पत्रिकांचे १२ गट दरदिवशी जन्माला येत असतात. आता यावरून 'पत्रिका समान म्हणजे जीवनही समान' असे प्रचलित पद्धतीमधे गृहीत धरलेले आहे, ते चुकीचे असल्याचे या वस्तुस्थितीवरून सिद्ध होते. *कारण जगांत वास्तव हे दिसते - या प्रत्येक गटातील १९००० जणांची पत्रिका समान असूनही सर्वांचे जीवन, म्हणजे त्यांच्या जीवनातील घटनाक्रम आणि त्यांच्या तारखा हे सर्व भिन्नच असते. या वस्तुस्थितीवरुन हे निर्विवादपणे सिध्द होते की जन्मपत्रिका हे अचूक भविष्यकथनाचे साधन होउच शकत नाही.* दुसरे म्हणजे अध्यात्म तत्वज्ञानाप्रमाणे या वस्तु स्थितीचे कारण असे आहे की 'जीवनातील अनेक घटना प्रारब्धा नुसार घडतात. प्रत्येकाचे प्रारब्ध भिन्न असते आणि कोणाचेही प्रारब्ध कोणालाही कळू शकत नाही. अशी ही ईश्वरी नियेंत्रण व्यवस्था असते.' तिसरा भाग असा की भविष्य सांगण्याच्या प्रचलित पध्दतीमध्ये असलेल्या नियमांचा पसारा खूप असून त्याचा यथाशास्त्र वापर मानवी स्मरणाच्या पलीकडील असल्याने एकाच पत्रिकेवरून दहा ज्योतिषांची दहा मते तयार होत असतात, जे शास्त्रबाह्यच आहे. या बाबत अधिक विवेचन पुढे आहे.

'हे खरे शास्त्र आहे का? उपयोगी आहे का?' या बाबत माझ्या संशोधनाचे उत्तर ठामपणे '**आहे**' हे आहे आणि तसे सिध्द झाले आहे. मी जमा केलेल्या ३५००० व्यक्तींच्या माहितीचा संग्रह आणि संशोधनांती तयार

केलेल्या 'जीवनमार्गदर्शन' सॉफ्टवेअरच्या- म्हणजेच 'ग्राफिक' सॉफ्टवेअरच्या- सहाय्याने **होराशास्त्राचा मुख्य नियम सिध्द झाला आहे. तो असा आहे** - '<u>विषयाची सुरुवात ही व्यक्तीच्या त्या विषयाच्या, ग्रहरचने नुसारच्या अशुभ कालावधीत झाली, तर त्या विषयाची भावी काळातील फळे अशुभ असतात; या उलट सुरुवात जर शुभ कालावधीत झाली असेल तर त्याची फळे भावी काळात शुभ असतात</u>.' आमचे हे सॉफ्टवेअर हे केवळ प्राचीन ज्योतिषशास्त्राच्या सर्व नियम आणि पध्दतीवर आधारलेले आहे. त्या नियम आणि पद्धतीत आम्ही काहीही बदल केलेला नाही. त्यासाठी आम्ही ३५००० व्यक्तीच्या आयुष्यातील विविध घटना, त्यांचे पुढील परिणाम, आणि ग्राफिक सॉफ्टवेअरने ठरवलेले काळाचे शुभ अशुभत्व यांना वरील नियम लावला आणि तो सत्य असल्याचे ९०% अचूकतेने सिध्द झाले आहे. **येथे विज्ञान विचार प्रणालीनुसार कोणत्याही संगणक अज्ञाप्रणालीची उत्तरे बाह्य वास्तवाशी चांगल्या टक्केवारीने अचूक येत असतील तर ती आज्ञाप्रणाली कशी आणि कशाच्या आधाराने बनविली आहे असा आक्षेप घेण्याचे विज्ञानाला कारण रहात नसते**. या सिध्दतेमुळे आपोआपच प्राचीन ज्योतिष शास्त्र पध्दती विज्ञान निष्टच आहे हे सहजतेने सिध्द झाले आहे. याच साठी आम्ही ज्योतिषशास्त्र वापर पध्दती मधील कुंडली विवेचनाचा आणि धार्मिकतेचा भाग दूर राखून विज्ञान आणि अध्यात्मिक विचारांचा मागोवा घेतला आहे. <u>(यात येणारे शुभ अशुभ कालावधी हे नवनिर्मित पंचाग पध्दतीचे बिलकुल नाहीत याचा खुलासा पुढे आहे</u>.) यातूनच आम्हाला अचूक मार्गर्शनाचा योग्य मार्ग सापडला.

या सर्वातून विज्ञानपध्दतीने हे सिध्द झाले की- 'जन्मपत्रिकेवरून अचूक भविष्यकथन अशक्य आहे. या शास्त्राचा उद्देश अचूक भविष्य सांगणे हा मुळीच नाही. या शास्त्राचा हेतु जीवनात मार्गदर्शन करणे हा आहे.' जीवनातील विविध विषयात आणि प्रश्नात 'ग्राफिक'च्या सहाय्याने ९०% अचूक, प्रारब्धनिष्ट मार्गदर्शन मिळते हे अनेक उदाहरणासह थोडक्यात मांडले आहे आणि याचाच खरा उपयोग होतो. प्राचीन शास्त्राचे खरे स्वरूप आणि उद्देश काय आहे ते कसे सिध्द झाले हे पुढे विषद केले आहे.

ज्योतिषशास्त्राविषयी समाजात दोन टोकांची मते आहेत. एका पक्षाचे ठाम मत आहे की 'ते खरे शास्त्र आहे. त्यावरून भविष्य समजते' दुसरा पक्ष हा प्रामुख्याने विज्ञानवादी लोकांचा आहे शिवाय या पक्षाचे संख्याबल खूप मोठे आहे. त्यांचे आव्हान असते की, 'एकाच प्रश्नांची दहा जणाची भविष्ये वेगवेगळी असतात आणि ती बहुतांशी चुकतात. मग हे शास्त्र कसे आणि याचा उपयोग तो काय? त्यामुळे हा एक प्रकारे अंध श्रध्देचा प्रकार ठरतो. या शास्त्रातून भविष्य कळते म्हणता तर ते सिध्द करा.' येथे पहिल्या गटाने ते शास्त्र आहे असे सिध्द केलेलेच नाही. शास्त्र सिध्द करताना हा पहिला गट धार्मिकता आणि शास्त्र पध्दती नियमांचा आधार घेत असल्याने ते विज्ञान निष्ट नाही असा दुसऱ्या गटाचे म्हणणे असते. विज्ञान युगात दुसऱ्याच गटाचे मान्य होण्यासारखे आहे. तरीपण दोन्ही गट आपापल्या मतावर ठाम आहेत.

<u>आमच्या जीवनमार्गदर्शन पध्दतीत आम्ही भविष्य वर्तवत नाही. तर ग्राफिकच्या सहाय्याने अचुक आणि उपयुक्त असे विषयवार, प्रारब्ध निष्ट आणि कालनिर्णयात्मक मार्गदर्शन करीत असतो. प्रचलित फलज्योतिष पध्दतीवर अनेक आक्षेप आहेत आणि ते जीवनमार्गदर्शन पध्दतीत आम्ही दूर केले आहेत. 'ग्राफिक' च्या साहाय्याने मिळणारे निर्णय विज्ञान पध्दतीचे असल्याने आणि ते निर्णय या शास्त्राच्या अभ्यासा विना कोणताही सामान्य माणूस सॉफ्टवेअरच्या साहाय्याने देऊ शकत असल्याने ते विज्ञानवाद्यांना स्वीकारायला अडचण राहिलेली नाही आणि तसा आमचा सध्याचा अनुभव आहे. आता अनेकांना सर्वत्र या पध्दतीचे मार्गदर्शन हवे असते आणि उपयोगी पडते.</u> हे छोटे पुस्तक पूर्ण वाचून आपण आपले मत ठरवावे आणि त्याचा फायदा घ्यावा अशी विनंती आहे. काही शंका असल्यास जरुन आमच्याशी संपर्क करावा. आपले स्वागतच होईल.

<u>विशेष नोंद</u> - १. <u>हा महत्वाचा विषय असून शक्य तेवढा सोपा करण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे. समाज प्रबोधन हा यातील मुख्य हेतू आहे. तरीही</u> ***<u>काही भाग क्लिष्ट वाटल्यास तो तूर्त बाजूला ठेवून पुढील भाग, विशेषत: उदाहरणे वाचावीत</u>***.

२. सुलभतेसाठी दैनंदिन व्यवहारात मराठीत रुळलेले इंग्लीश शब्द तसेच वापरले आहेत.

३. आधीच्या लेखात 'ग्राफिक' सॉफटवेअर असा उल्लेख रुळला असल्याने तसाच वापरला आहे. याचे अधिकृत नाव 'जीवनमार्गदर्शन' सॉफटवेअर असून त्याला ट्रेडमार्क मिळालेला आहे.

<u>शब्दसूचि</u>- शास्त्रातील काही शब्द पुढे अनेकवेळा आले आहेत. त्यांचा अर्थ येथे सुरुवातीला देत आहोत.

क्रांतिवृत्त- सूर्य आणि अन्य ग्रहांच्या आकाशातील भासमान भ्रमणमार्गाला क्रांतिवृत्त म्हणतात. याची १२ राशीत, ३६० अंशात विभागणी कल्पिलेली असते.
लग्नबिंदू- क्रांतिवृत्ताच्या पूर्व क्षितिजाला चिकटलेल्या बिंदूला लग्नबिंदू म्हणतात. हा दर २४ तासात सर्व राशीमधून भ्रमण करतो असे भासते कारण पृथ्वी स्वत:भोवती २४ तासात फिरते.
लग्नभाव- पत्रिकेत १२ भाव, म्हणजे भाग, असतात. सर्वात वर मध्यभागी असतो तो १ ला भाव. यालाच लग्नभाव म्हणतात.
लग्नराशी- जन्मवेळी लग्नबिंदू ज्या राशीत असतो, त्या राशीला लग्नराशी म्हणतात. जन्मलग्नपत्रिकेत १ ल्या भावात लग्नराशी लिहून इतर राशींची नावे क्रमाने इतर भावात लिहिण्याची प्रथा आहे.
गोचरी- सर्व ग्रहांचे नित्य भ्रमण चालू असते. ग्रहांच्या दररोजच्या आकाशातील स्थानाला गोचरी म्हटले जाते.
चलित पद्धत- याचा येथे अर्थ 'गोचर ग्रहस्थितीचा विचार करुन' असा आहे.

आपले
**लेखक- डॉ. दादा गाडेकर,** Ph. D., Mob. 08796162691, Email- bs_gadekar@rediffmail.com
**लेखनसहाय्य- विजय म्हैसकर,** M.E., Mob. 098673 99870, Email- vijay249@hotmail.com)

## अनुक्रमणिका

**प्रास्ताविक**

**प्रकरण १- संशोधनाचा तपशील, 'जीवनमार्गदर्शन'- म्हणजेच 'ग्राफिक' सॉफ्टवेअर आणि जीवनमार्गदर्शन पद्धत**

या भागामध्ये केलेले संशोधन, 'जीवनमार्गदर्शन'- म्हणजेच 'ग्राफिक' सॉफ्टवेअर आणि ग्राफ, अनेक उणीवांचे जीवनमार्गदर्शन पध्दतीत केलेले निराकरण आदि आवश्यक माहिती दिली आहे. जीवनमार्गदर्शन पध्दती ही प्राचीन शास्त्रातूनच विकसित केली आहे हे यावरुन लक्षात येईल. ही माहिती पूर्ण वाचल्यानंतर पुढील भाग वाचावेत.

**प्रकरण २-'ग्राफिक'ने दिलेल्या अचूक, सफल मार्गदर्शनाची उदाहरणे.**

अनेक पानांच्या विवरणापेक्षा थोडया प्रत्यक्ष उदाहरणानी विषय कळणे जास्त सोपे असते. यासाठी 'ग्राफिक'ने दिलेल्या मार्गदर्शनाचा प्रत्यक्ष उपयोग कसा झाला याची उदाहरणे असणारे आमचे लेख या भागांत दिले आहेत. प्रश्नाचे विश्लेषणही ग्राफने, आणि मार्गदर्शनही ग्राफवरूनच केले जाते एवढेच नव्हे तर उपाय योजनाही ग्राफनुसारच दिली जाते. कोणती गोष्ट कोणतया कालावधीत करावी आणि करायचीच असेल तर कोणत्या कालावधीत करावी तसेच केव्हा करू नये असे उपयुक्त मार्गदर्शन असते. ग्राफिकच्या निर्णयाचा उपयोग सामान्य लोक, विविध व्यावसायिक, व्यापारी, उद्योजक आणि संस्था अशा सर्वांना कसा होतो ते या लेखावरून स्पष्ट केले आहे.

**प्रकरण ३- अनेक लेखातील केसेसचे 'ग्राफिक'ने केलेले विश्लेषण अचूक.**

अनेक उदाहरणे 'ग्राफिक'ने तपासून ग्राफचे निर्णय घटनेच्या पुढील परिणमाशी कसे अचूक जुळतात हे दर्शविणारे लेख या भागात दिले आहेत ही उदाहरणे अन्य लेखकांच्या प्रकाशित लेखातील विविध विषयाची असून त्याचे संदर्भ दिले आहेत. घटना किंवा विषय सुरू होणाच्या तारखेच्या ग्राफमधील शुभ - अशुभत्वा वरून फळे इच्छनीय की अनिच्छनीय प्रकारची असतील हे 'ग्राफिक'ने ९०% अचुकतेने दर्शविले जाते.

**प्रकरण ४- जीवनमार्गदर्शन कडून उपलब्ध असलेल्या सेवा सुविधा.**

ग्राफिकच्या सहायाने अल्प फी मध्ये लिखित स्वरूपात मार्गदर्शन सत्वर दिले जाते. अल्प फी घेतली जाते कारण फुकटच्या सल्याला काहीच किम्मत दिली जात नाही म्हणून. ग्राफिक सॉफ्टवेअरची विक्री आणि मार्गदर्शन यासाठी आम्ही जीवनमार्गदर्शन प्रा. लि. ही संस्था स्थापन केली असून त्या मार्फत आमचे काम चालते. कारण कोणा एका व्यक्ति पेक्षा संस्था ही अधिक दीर्घजीवी असल्याने अधिक विश्वासार्हता असते.

**प्रकरण ५- 'ग्राफिक' सॉफ्टवेअरच्या सहाय्याने वेगळया प्रश्नांचे शोधन**

'ग्राफिक' सॉफ्टवेअर वापरून मी काही बाबतीत संशोधन केले आहे. त्यांची अचूकता चांगली आहे, पण अद्याप ते पूर्णत्वाला गेलेले नाहीत. यामधे आणखी संख्येने केसेस जमा करून नंतर अचूकतेची टक्केवारी नक्की होईल. 'ग्राफिक' सॉफ्टवेअरचा उपयोग विविध प्रकारे करणे कसे शक्य आहे ते यावरून कळेल.

ज्या त्या प्रकरणात दिलेल्या लेखांची यादी त्या प्रकरणाच्या सुरूवातीला आहे. लेखांचे अ.नं. हे साईटवर दिल्याप्रमाणे आहेत. मूळ पूर्ण लेख आणि इतर अनेक लेख आमची बेबसाईट www.jeevanmargdarshan.com वरील डाउनलोड विभागात मराठी, इंग्रजी आणि हिंदी मध्ये उपलब्ध आहेत. सर्व लेखांची अनुक्रमणिका संदर्भासाठी शेवटी दिली आहे.

# प्रास्ताविक

भविष्य वर्तवण्याच्या फलज्योतिष, हस्तरेषा, डाउझिंग, मेदिनीय, आयचिंग, न्युमॅरिक, वास्तू, टॅरोकार्ड, रमल-फासे, आणि अशा अनेक पध्दती आहेत आणि त्यांची वेगवेगळी वैशिष्ट्ये आणि मर्यादा आहेत. यात फलज्योतिष पध्दती ही सर्वात अधिक वापरली जाते. फलज्योतिषातही पारंपारिक, वेस्टर्न आणि कृष्णमूर्ति पध्दती इत्यादि अनेक पध्दती आहेत. सर्वच तत्सम पद्धतीबद्दल मला आदर असून त्यांना आमच्या या संशोधनाचा उपयोग होणार आहे. कोणत्याही पद्धतीतील दोष काढणे, त्यावर टीका करणे हा माझा उद्देश बिलकुल नाही. परंतु सर्वच शास्त्रांना काळाबरोबर राहण्यासाठी संशोधन आवश्यक असते आणि तीच कमतरता सर्वत्र आढळते. या शास्त्राबद्दलच्या माझ्या १९६५ पासूनच्या संशोधनाचे निष्कर्ष आपणासमोर साकल्याने, साधार मांडणे हा माझा उद्देश आहे. कृपया आपण वेळ काढून हे पूर्ण वाचावे अशी नम्र विनंती आहे. ते निष्कर्ष स्वीकारायचे का नाही हा अर्थातच सर्वस्वी तुमचा निर्णय असेल.

**ज्योतिषशास्त्राची सध्याची स्थिती :** या शास्त्राची सध्याची स्थिती मोठी गोंधळाची आहे. यात अनेक पध्दती आहेत. अनेक बाबी बाबत मतभेद आहेत. परचक्रे, परकीय सत्ता अशा अनेक कारणांनी यातील ज्ञानपरंपरेला खंड पडून बरेच ग्रंथ आणि ज्ञान नाहीसे झाले असावे. सुयोग्य, पध्दतशीर संशोधनाचा अभाव दिसतो. विरोधी विचारसरणीला मुळीच स्थान दिलेले नसते. तरीही हे शास्त्र २००० वर्षापासून टिकून आहे, म्हणजे यात काहीतरी तत्थ्य निश्चितच आहे, नाहीतर हे टिकलेच नसते. एकाच व्यक्तीच्या एकाच प्रश्नासाठी दहा ज्योतिष अभ्यासकांची १० वेगळी उत्तरे असतात हे सध्याचे वास्तव आहे. याच कारणासाठी या शास्त्राची किंम्मत सध्याच्या विज्ञानप्रभावित समाजात कमी झाली आहे. विज्ञानवाद्यांकडून वरचेवर या शास्त्राला 'हे शास्त्र आहे हे सिद्ध करा' असे आव्हान दिले गेले आहे. हे खरेच शास्त्र असेल तर १० जणांचे उत्तर एकच हवे असे कोणीही म्हणेल आणि ते चुकीचे नाही. (यात दोष सर्वस्वी त्या अभ्यासकाचा असतो असे मी तरी मानीत नाही व याची कारणे पुढे दिली आहेत.) सध्याचे जग विज्ञानाने प्रभावित झालेले आहे. त्यामुळे या आव्हानाला विज्ञानपद्धतीप्रमाणे समर्पक, स्वीकारार्ह असे उत्तर दिले पाहिजे. पण हे आजवर झालेले नसल्याने या शास्त्राची अवहेलना होत आहे. 'हे शास्त्र आहे' असेच मला वाटत होते, पण नुसत्या वाटण्याला अर्थ नाही, ते विज्ञान पध्दतीने सिद्ध झाले पाहिजे, तरच हे शास्त्र टिकेल.

**मूळ विचारधारेत बदल न करता विज्ञान आधाराने अत्यावश्यक सुधारणा :-** खरेतर मला आमच्या प्राचीन ज्योतिष शास्त्राच्या पारंपारिक विचार पध्दतीत कोणताही बदल, अगर व्यक्तिशः ढवळा ढवळ करायची नव्हतीच. मात्र मार्गदर्शनासाठी शास्त्राचा वापर करताना जेथे ज्या कमतरता होत्या त्यात काही सशास्त्र सुधारणा करावयाच्या होत्या. त्यामुळे येथे 'बदल करणे' हा विषय घेतला नाही, तर शास्त्र वापरात होत असलेल्या चुका अगर कमतरतांचे विज्ञान पध्दतीच्या आधाराने निवारण करणे हा येथे माझा उद्देश आहे.

**गोचरीच्या सहायाने चलित अनुमान पध्दतीचा समावेश :** जन्मपत्रिका म्हणजे जन्मवेळी त्या स्थळी असलेला आकाशाचा नकाशा असतो. पत्रिकेत बारा भाव असतात. पूर्व क्षितिजाला चिकटलेली जी राशी असेल ती पहिल्या भावात मांडून इतर राशींची नावे क्रमाने इतर भावात मांडली जातात आणि ग्रह ज्या राशीत असतील त्याप्रमाणे

लिहिले जातात. ग्रह कोणत्या राशीत, भावात आहेत, त्यांचे एकमेकांसंबंधात स्थान आणि अंशात्मक अंतर किती आहे यावरून शुभत्व - अशुभत्व ठरविण्याचे असंख्य नियम शास्त्रात आहेत. मूळच्या जन्मपत्रिका पध्दतीचा बारकाईने विचार केल्यास जीवनाचा आरंभ हा जन्म तारखेने होतो आणि त्या तारखेस असलेल्या ग्रहरचने नुसार भावी काळातील जीवन घडामोडींचा मागोवा घेतला जात असतो. म्हणजेच जन्म तारीख स्थिर स्वरूपाने आयुष्यभर वापरायची ही पध्दती त्यात अवलंबिली होती आणि त्याबरोबर कालनिर्णयासाठी गोचरीचा विचार करायला सांगितले आहे. पण या स्थिरपणामुळे समग्र जीवनाला सर्वंकषपणे स्पर्ष होत नाही असे मला दिसून आले. एक उदाहरण पहा : 'विश्वनाथन् आनंद २०१३ चा बुद्धिबळ वर्ल्डकप का हरला' हा लेख पहा. त्याने यापूर्वी अनेक वेळा बुध्दीबळात विजय मिळवला होता. तो 'या वेळेस का हरला' हे शोधायला त्याची पूर्वीचीच पत्रिका घ्यावी लागणार, मात्र शास्त्रात कालनिर्णयासाठी गोचरीचा वापर करायला सांगितले आहे. याचा विचार करता आपल्याला लक्षात येते की, 'मग त्याला अपयश का आले?' याचे उत्तर हे गोचरीत असणार. गोचरी चा वापर सामान्य जन्मपत्रिकेशी जोडणेचा अभ्यास आपल्याकडे अपुरेपणाचा किंबहूना अनेकांच्या अनेक पध्दतीत विस्कळीत असा आहे.

पारंपारिक शास्त्रपध्दतीतील हाच विचार पुढे शास्त्र वापर पध्दतीत चलित पध्दतीने वापरायचे मी ठरविले. जीवनाचा विचार करताना मूळच्या शास्त्रातून अभ्यास करून मी निवडलेले विषय एकूण ४३ होते. प्रापचिक जीवनातील कोणत्याही प्रश्नाचा विचार या ४३ विषयातून योग्य ते विषय निवडून करता येतो. या सर्वच ४३ विषयांना सुध्दा प्रारंभ हा असणारच आणि त्याचा जन्मपत्रिकेनुसार वापर दुर्लक्षित राहिला आहे. तो का आवश्यक आहे याचा पुढे खुलासा येणारच आहे.

माणसाच्या जीवनात बालपणा पासून स्वपायावर उभे रहाणे, स्वावलंबी बनणे, आणि शिक्षणाचा श्रीगणेशा सुरू करणे हा पहिला टप्पा होतो. त्यानंतरचा दुसरा टप्पा म्हणजे चालण्यापासून शिक्षण पूर्ण करण्यापर्यंतचा. या दोन्ही टप्प्यात आईवडिलाचा आधार आणि मिळतो. त्या नंतर स्वमताने नोकरी, विवाह इत्यादि सुरू होउन स्वतंत्र, स्वावलंबी जीवनाची सुरवात होते. शेवटी वृध्दापकाळ येतो. या सर्व प्रकारच्या टप्प्यात ज्या त्या काळापुरते हरेक प्रकारचे प्रारंभ करण्याचे असंख्य विषय असतात. त्यात उच्च अथवा व्यावसाईक शिक्षण, नंतर शिक्षण आणि नोकरी- व्यवसायाचे प्रारंभ, त्यानंतर विवाह, प्रपंच, घर, मालमत्ता घेणे यांचा प्रारंभ, येथेच जोडीने स्वतंत्र रहाणे वगैरे विचाराचा प्रादुर्भाव अशा अनेक विषयाच्या प्रारंभाचा संबंध जीवनात येत असतो. नेमके यातच पुरेसे संशोधन नसलेची उणीव माझ्या लक्षात आली.

मूळच्या शास्त्रात परंपरेने असलेली जन्म तारखेची स्थायी स्थिर पध्दतीच मी चलित केली. वर दिलेल्या विषयाचा प्रारंभ म्हणजेच त्या विषयाचा प्रारंभ/जन्म याला शास्त्रपध्दतीत महत्व दिलेले होतेच पण ते दुर्लक्षित होते, त्याची बांधणी केली आणि प्रत्येक विषयाचा प्रारंभ ही जन्म तारीख/वेळेने बांधून चलित केला. स्पष्टीकरण असे- उदा. विवाह हा विषय घेतला तर विवाह हा कौटुंबिक जीवन, संतती/ प्रजोत्पादन, स्वत:चा संसार उभारून लाभ मिळविण्याचा प्रयत्न करणे या सगळ्यांची सुरुवात विवाहाने होते. म्हणून विवाहाची तारीख ही विवाह - कौटुंबिक जीवन - संतती या विषयांची जन्म तारीख ठरते. त्या विवाहाच्या दिवशी असलेल्या ग्रहरचनेच्या शुभ अशुभत्वाचा विचार आणि त्याने दाखविलेली परिणामांची दिशा हे पाराशरांच्या होरा नियमाप्रमाणे पूर्वी गृहित धरले होतेच. अशा तह्रेने विवाहाची तारीख हीच कौटुंबिक जीवनाचा चलित जन्मतारीख तयार होते. जन्म पत्रिका आणि या तारखेच्या ग्रहरचनेनुसार त्या त्या विषयाची चलित प्राप्तव्य अंदाजित करण्याची सोय शास्त्रातून उपलब्ध करता येते.

पाराशरांच्या होरापद्धतीनुसार प्रत्येक विषयाच्या प्रारंभाच्या दिवशीच्या शुभत्व-अशुभत्वा प्रमाणेच भावी परिणामांची दिशा असते.. हे अजून समजण्यासाठी दुसरा महत्वाचा व्यवसायाचा विषय घेऊ. प्राचीन पध्दती मध्ये उपजीवन हा एकच विषय आहे. त्यातच पुढील काळात नोकरी, व्यवसाय हे दोन भाग पडले. तर या पध्दतीत नोकरीवर हजर रहाणे अगर व्यवसाय सुरू करणेचा प्रारंभ ही उपजीवन व्यवस्थेची जन्मतारीख घेऊन, त्यातून सुख प्राप्तीचा चलित मार्ग उपलब्ध होत असतो. ओघानेच विवाहाची तारीख, उपजीवनाची सुरवात होण्याची तारीख ही जर पत्रिका, पारंपारिक शास्त्रानुसार गोचरी, शास्त्राचे सर्व नियम, पध्दती व साडेतीन लाख फलित वाक्यांचा संग्रहानुसार विज्ञान पध्दतीच्या आधारित असलेल्या ग्राफिक सॉफ्टवेअरच्या सहायाने मिळणारा प्रारब्धनिष्ठ शुभ कालावधीत असेल तरच कौटुंबिक जीवन व उपजीवन सुखकर होणार, असा याचा सशास्त्र अर्थ होतो. मात्र या तारखांना अशुभत्व असेल तर ते सुख मिळणार नाही हे स्पष्ट होते. 'ग्राफिक' शिवाय हे दिवसांचे विषयवार शुभ-अशुभत्व काढणे कदापीही शक्य नाही हे ग्राफिक पध्दतीने अनेक रिसर्चच्या सहायाने सिध्द झाले आहे.

महत्वाची बाब हे असे करणे का अत्यावश्यक आहे? याचे कारण असे की शास्त्रात असलेली दुसरी मोठी उणीव दूर करण्यासाठी या बदलाचा उपयोग होणार होता. कोणी कितीही नाही म्हटले तरी विकेपिडीयाच्या माहिती नुसार

२४ तासात जन्मणार्या २२८००० मुलांना १२ राशीने भागले तर कमीत कमी १९००० (आणि जास्तीत जास्त ३१०००) मुलांचा जन्म प्रत्येक लग्न राशीवर होत असतो. बारकाईने आपण विचार केला तर पत्रिका रीडींगच्या विचारानुसार स्थूलमानाने या सर्व मुलांच्या १९००० पत्रिकात ग्रह रचनेत काहीच फरक दिसून येत नाही. ग्रहांची रोजची गती ही फारशी नसल्याने असे होत असते. अशाच रीतीने १२ राशीमध्ये प्रत्येक लग्न राशीवार जुळ्या जन्मपत्रिकेनुसार १९००० मुलांच्या पत्रिका समान असतात. मग प्रचलित पत्रिका रीडींग पध्दती नुसार त्या त्या सर्व लोकांना एकाच दिवशी नोकरीला लागणे, एकाच दिवशी विवाह होणे आणि एकाच दिवशी या सर्वांना मृत्यू येणे शक्य आहे का? अर्थातच नाही. याला जर होकार असेल आणि आजवर आमच्या या समान जन्मपत्रिकेच्या विचाराला कोणाचा विरोध नसेल तर याचा अर्थ काय आहे हे वेगळे सागण्याची गरज नाही.

या वास्तवाने 'जन्मपत्रिकेवरून अचूक भविष्य कळू शकते' हे गृहीत धरणे ही मोठीच उणीव असल्याचे निर्विवादपणे सिध्द होते आणि ती नाकारताच येत नाही. म्हणजेच जुळ्यांच्या पत्रिका समान असल्या तरी त्यांचे प्रारब्ध भिन्न असल्याने त्यांच्या जीवनात घडणाय्रा घटना कधीच एकसारख्या असणार नाहीत हे आपोआपच सिध्द होत असते. यालाच अनुसरून आमच्या पध्दतीत जो महत्वाचा बदल केला आहे तो म्हणजे पत्रिका समान असल्या तरी त्यांच्या जीवनात घडणाय्रा घटनांच्या तारखा भिन्न असतात, त्यामुळे त्याच तारखा जर ग्राफमध्ये तपासल्या तर त्याचे प्रारब्धनिष्ठ उत्तर भिन्न भिन्न येणार आहे. आता याला सिध्दतेचे रूप कसे द्यायचे? तर त्यासाठी आम्ही केलेले असंख्य रिसर्च, त्यातील आलेल्या अचूक निर्णयासह तुमच्या समोर ठेवणार आहोत. ज्या मुळे आम्ही सद्गुरू कृपेने केलेला हा प्रयत्न उचितच आहे ते तुमच्या अनुभवास येईल ही अपेक्षा आहे. सोबत संशोधन, आणि त्यातून प्राप्त झालेले अचूक मार्गर्शन समाजाला कसे उपयुक्त ठरते आहे या विषयीचे अनुभव नमूद करणारे लेख सोबत जोडले आहेत.

संशोधनासाठी मी ३० वर्षात, प्रौढ म्हणजे ४० वर्षे वा अधिक वयाच्या सुमारे ३५००० व्यक्तींच्या जीवनातील विविध विषयातील घटना, घटनांच्या तारखा, पुढील काळात मिळालेल्या फळांचे स्वरूप ही माहिती जमा केली. यावरून प्राचीन शास्त्राच्या नियम आणि पद्धतींची सध्याच्या काळातील अचूकता आणि फलदातृत्व क्षमता टक्केवारीत काढायची होती. या साठी मला स्वत:ला अनेक सॉफ्टवेअर तयार करावी लागली. (कारण कोणाचीही मदल मिळाली नाही.) ग्रह, भाव, राशी, नक्षत्रे, क्रांतिवृत्ताच्या ३६० अंशाची कारकत्वे, आणि याच्या संयोगाने मी साडेतीन लाख वाक्यांचा फलित संग्रह तयार केला तो अशी सर्व माहिती सॉफ्टवेअरच्या डेटाबेसमध्ये आहे. हे सर्व वापरून केवळ प्राचीन/पारंपारिक शास्त्राच्या नियम आणि पद्धतीवर आधारलेले, 'ग्राफिक' सॉफ्टवेअर मी स्वत: बनविले. 'ग्राफिक'च्या सहाय्याने होराशास्त्राच्या नियमाची आणि पर्यायाने प्राचीन ज्योतिषशास्त्राची सत्यता सिद्ध करण्यात मला शैक्षणिक पात्रता नसतानाही सद्गुरु कृपेने यश आले. 'ग्राफिक'ची अचूकता ९० टक्के आहे. या संशोधनांती माझा ५०० पानी प्रबंध 'जीवनमार्गदर्शन- अध्यात्म, विज्ञान आणि ज्योतिष' हा स्वीकृत होऊन मला पी. एच. डी. पदवी दिली गेली. नंतर २००९ चा 'ग्रहांकित जीवनगौरव पुरस्कार' दिला गेला.

अनेकांना वाटते की आम्ही ज्योतिष शास्त्र आणि पंचांगातील मुहूर्त वापरतो मग हे ग्राफ कसे तयार करायचे हे शिकवले तर सॉफ्टवेअर घेण्यापेक्षा आम्हीच ग्राफ तयार का करू शकणार नाही? याला एका वाक्यात उत्तर असे आहे की हे मानवी स्मरणशक्तीच्या कुवतीच्या बाहेरचे काम आहे. हे कोणालाही, मलाही, कॉम्प्युटरशिवाय तोंडी काढणे अशक्य आहे. याचे मुख्य कारण गोचरी, साडेतीन लाख फलित संग्रह आणि सर्व पध्दतीचा वापर तोंडी करता येणे इतके शक्य नाही.

**माझा संशोधनातून विज्ञानपद्धतीने मुख्यत्वाने हा निष्कर्ष सिद्ध झाला की** '' ज्योतिषशास्त्र हे शास्त्र आहे, पण त्याचा हेतू अचूक भविष्य सांगणे हा नाही. या शास्त्रातून अचूक भविष्य सांगणेही शक्य नाही.'' अनेक आधारासह मी हे समाजासमोर मांडले. समाजात अनेक शतकांपासून ठाम समज रूढ आहे की 'ज्योतिष शास्त्रातून भविष्य कळते'. या खूप जुन्या, रूढ समजाला माझा निष्कर्ष काट देणारा होता. प्रस्थापित रूढी, समजुती याविरूद्ध असणाऱ्या योग्य अशा गोष्टी स्वीकारायला सुद्धा समाजाला अनेक वर्षे लागतात असे इतिहास सांगतो, ते अनुभवाला आले. परंतु 'ग्राफिक' सोफ्टवेअर विज्ञानपद्धतीने सिद्ध झालेले असल्यामुळे, त्याच्या सहाय्याने केलेल्या मार्गदर्शनात विज्ञानाला अमान्य असे काहीही नसल्यामुळे, विज्ञानवाद्याना काहीच अडचण नाही.

सखोल, प्रदीर्घ संशोधनातून निश्चित, अचूक निष्कर्ष आल्यानंतरच १९९५ पासून याविषयी मी लेख लिहू लागलो. ते 'ग्रहांकित', ज्योतिषज्ञान, नक्षत्राचे देणे, ज्योतिष- तंत्र आणि मंत्र आणि अन्य मासिके, अनेक वृत्तपत्रे, इंटरनेटवरून पीडीएफ फाईल मार्फत तसेच आमची वेबसाईट www.jeevanmargdarshan.com यावर

प्रकाशित झाले. (वेबसाईटचा 'डाऊनलोड' विभाग पहा.) या लेखांचे विषय भिन्न भिन्न होते. काही लेखात माझे संशोधनाचे निष्कर्ष, ग्राफिक सोफ्टवेअर, ग्राफ, ग्राफचे शुभ- अशुभ कालावधी याबद्दल माहिती होती. अनेक लेखात अन्य लेखकांच्या केसेस घेऊन अशुभ फळे मिळालेल्या विषयाची सुरुवात नेहेमी ग्राफच्या अशुभ कालावधीत कशी होती ते दर्शविले होते. (उदा. घटस्फोट झाला तर विवाहाची तारीख विवाह आणि कौटुंबिक सुख या ग्राफमध्ये अशुभ, नोकरी गेली तर नोकरी सुरु झाल्याची तारीख व्यवसाय आणि आर्थिक या ग्राफमध्ये अशुभ. व्यवसाय बंद पडला, तर त्याची सुरुवात नेहेमी व्यवसाय आणि आर्थिक या ग्राफमध्ये अशुभ इ.) संबंधित तारीख ग्राफिक मधून मिळणाऱ्या विषयवार कालावधीत शुभ का अशुभ आहे यावरून प्रारब्धाची दिशा कशी कळते. ग्राफिक आणि होराशास्त्र यांच्या समन्वयाने जीवनातील अडचणींचे विश्लेषण आणि अडचणीवर अचूक, उपयुक्त मार्गदर्शन कसे देता येते, त्यामधील नवा काही विषय सुरु करताना शुभ कालावधीचा उपयोग करण्याचा लाभ काय. या सर्वांचा उहापोह विविध लेखात आला आहे. आपल्याही वाचनात यातील काही लेख बहुधा आले असतील. हे सर्व साकल्याने एकत्र थोडक्यात मिळावे म्हणून सोबतच्या वेग वेगळ्या फाइल तयार केल्या आहेत. 'ग्राफिक'चे एकूण ४३ विषय आहेत. यातून जीवनातील कोणत्याही विषयातील प्रश्नामध्ये मार्गदर्शन मिळते. असे आजवर ८१ लेखात ५१७ घटना व ९९० ग्राफचे निर्णय अचूक असून अशा एकूण १५०७ बाबी सोदाहरण दर्शवू शकलो ते सिध्द झाल्यामुळेच ना?. या विज्ञानसिध्द झालेल्या ग्राफचा उपयोग करून आम्ही विज्ञान मान्य उपाय योजना सांगतो व त्या उपयोगी ठरतात.

खात्री नसणाऱ्या भविष्यापेक्षा समाजाला उपयुक्त आणि अचूक अशा मार्गदर्शनाची गरज असते. यासाठी त्याला जे बरोबर उपयुक्त तेच दिले गेले पाहिजे. 'ग्राफिक'च्या सहाय्याने भविष्य वर्तविले जात नाही, पण अचूक आणि उपयुक्त मार्गदर्शन दिले जाते. याचसाठी आम्ही **जीवनमार्गदर्शन पद्धत** असे नांव दिले आहे. माझी ईश्वरी सत्तेला मान्यता आहे. केवळ ईश्वरच १०० टक्के अचूक असतो. असे असल्याने 'ग्राफिक' हे परिपूर्ण आहे असे मी मुळीच मानत नाही, पण त्याची अचूकता ९०% आहे. या पद्धतीने जीवनातील कोणत्याही प्रश्नात अनेक अंगानी विश्लेषण करून जसे अचूक, उपयुक्त मार्गदर्शन ५-१० मिनिटात देता येते तसे प्रचलित पद्धतीत बव्हंशी शक्य होत नाही. कित्येकांना अभ्यास व अनुभव नसल्याने 'केवळ ग्राफच्या शुभ अशुभत्वावर सर्व प्रश्नांची उत्तरे कशी देता येतील' हा संभ्रम होईल, पण तो हे पुस्तक वाचून दूर होईल. उलट कित्येक प्रश्न असे असतात की ज्यात प्रचलित पद्धतीने काही सांगता येत नाही, केवळ ग्राफिकने अचूक मार्गदर्शन देता येते. अनेक लेखात अन्य लेखकांच्या लेखात आलेल्या केसेसचे विश्लेषण 'ग्राफिक'ने करून 'ग्राफिक'चे निर्णय कसे अचूक येतात हे आम्ही दर्शविले आहे. खात्री करण्यासाठी तुम्ही तुमच्या पध्दतीने तेच प्रश्न सुटतात का हे प्रयत्न करून सोडवावे म्हणजे लक्षात येईल. 'ग्राफिक'च्या अचूक मार्गदर्शनाने नुकसान आणि मनस्ताप वाचतो याची अनुभवाला आलेली उदाहरणेही आम्ही समाजासमोर ठेवली आहेत. या सोयीमुळे सर्वसाधारण समाज, तसेच विज्ञानप्रभावित लोकही याचा स्वीकार करू लागले आहेत. जसजसा अनुभव घेत आहेत, तसा विरोधही आता कमी होत आहे.

**विनंती-** सर्वांच्याच सर्व केसेस नित्याने अचूक/बरोबर येत असतील असे मी कधीच मानीत नाही. आपल्याला हव्या त्या पद्धतीचा सल्ला आपण वापरत असतो, पण त्यात भविष्यकथन चुकण्याचे प्रमाण फार मोठे आहे असे दिसून येते. किंबहुना ज्योतिषाला स्वत:च्या घरातील प्रश्न उदा. मुलगा/मुलीचे लग्न कधी होईल, नोकरी कधी लागेल, घर कधी होईल इत्यादीची अचूक उत्तरे मिळत नाहीत ही वस्तुस्थिती आहे. यामुळे अभ्यासकाला वाटते की आपला अभ्यास, अनुभव अपुरा पडत असेल, आपलेच काही चुकत असेल. शास्त्राचा तंतोतंत वापर करूनही उत्तर बरोबर येत नसल्याचा अनेकांचा अनुभव आहे. यात सर्वस्वी ज्योतिष अभ्यासकाचा दोष नाही. याची महत्वाची कारणे अशी आहेत- १) या शास्त्राचा विस्तार अफाट आहे. त्याचा अभ्यास आणि तंतोतंत वापर करणे हे मानवी स्मरणशक्तीच्या क्षमतेच्या बाहेर आहे. प्रश्नाचा विचार करताना पत्रिकेवरून अनुकूल आणि प्रतिकूल दोन्ही प्रकारचे नियम लागू होताना आढळतात, त्यात कोणते निवडायचे हे अचूक ठरवायला मार्ग नाही. पण दोष असा निर्माण होतो की हा विचार बाजूला राहून स्वत:च्या, व्यक्तिगत मताने काही पर्यायी चुकीचे उत्तर दिले जाते. २) आणखी एका वास्तवाकडे मी आपले लक्ष वेधतो. संपूर्ण जगात मिळून दरदिवशी प्रत्येक लग्नराशीवर सरासरी १९००० बालकांचा जन्म होत आहे. म्हणजे या १९००० जणांची जन्मलग्न कुंडली समान असते. तरीही या प्रत्येकाचे जीवनातील घटना आणि काळ भिन्न असतात असेच वास्तवात दिसते. याचा अर्थ जन्मकुंडली हे अचूक भविष्य कथनाचे साधन होऊ शकत नाही.

'ग्राफिक' अचूक आहे हे आम्ही म्हणतो म्हणून तुम्ही मान्य करू नये. आपण खात्री करून घ्या. यासाठी आमची आपणास अशी विनंती आहे की आपणाकडील काही क्लिष्ट केसेस (ज्यात व्यक्तीची जन्मतारीख आदि

कुंडलीला लागणारी माहिती, घटना, घटनेची तारीख, पुढे मिळालेली फळे बरी की वाईट याची माहिती आहे अशा) आमच्याकडे पाठवा. त्यांचा आम्ही ग्राफिकने मिळालेला निर्णय आपणास कळवू. या तऱ्हेने खात्री करून घेणे हा आपला किंवा कोणाचाही अधिकार आहे व यासाठी आपणास आमचा आग्रहही आहे. यातून ग्राफिक'च्या सहाय्याने अधिक संशोधन करायला मदतही होईल. आमचे उत्तर गाडेकर वा म्हैसकर यां व्यक्तींचे व्यक्तिगत विचाराचे नसून 'ग्राफिक' सोफ्टवेअरचे असते म्हणजेच ते शास्त्राचे आहे.

सध्या रूढीच्या प्रभावामुळे लोक ज्योतिषाना भविष्यात्मक प्रश्न विचारतात. भविष्य सांगितले की लगेच ''काय आणि केव्हा करू, उपाय काय ते सांगा'' असा त्यांचा पुढचा प्रश्न असतो. भविष्यात्मक उत्तरे ही घटना आणि अथवा तिचा काळ या अंगानी मोठ्या प्रमाणात चुकतात हा सार्वत्रिक अनुभव आहे. ज्योतिषाना आमची एक नम्र विनंती आहे. आपण येणाऱ्या प्रश्नाचे उत्तर आपण आपल्या पद्धतीने काढावे, जरूर तेव्हा आपण आमच्याकडून (किंवा कोणाही 'ग्राफिक'धारकाकडून) त्या प्रश्नाबाबत ग्राफिकचा निर्णय घ्यावा. आपला आणि ग्राफिकचा निर्णय या दोन्हीचा समन्वय करून व्यक्तीला उत्तर द्या. आपला आणि आमचाही हेतू हाच असतो की व्यक्तीला, समाजाला अचूक, उपयुक्त मार्गदर्शन मिळावे. ग्राफिकचे उत्तर आम्ही अल्प फी मध्ये देत असतो. यापूर्वीच अनेक ज्योतिषांनी त्यांच्याकडे आलेल्या प्रश्नावर आमच्याकडून 'ग्राफिक'चे निर्णय मागविले आहेत आणि मागवीत असतात. त्यांचा अनुभव चांगला आहे. आपणही अनुभव घ्या. नंतर आपणास खात्री होईल तेव्हा आपण आमच्याकडून हे सोफटवेअर विकतही घेऊ शकता अथवा अल्प फीमध्ये आमच्याकडून ३६-जोडविषय योजनेत एक वर्षाचे मार्गदर्शन घेऊ शकता. अल्प फी म्हणजे ४०० रु भागिले ३६ म्हणजे प्रतिप्रश्न केवळ अकरा रुपये खर्च तुमचा होतो.

आपले नम्र,

जीवनमार्गदर्शन प्रायवेट लिमिटेड करिता

| डॉ. दादा गाडेकर, मेनेजिंग डिरेक्टर. | विजय रा. म्हैसकर, डिरेक्टर |
|---|---|
| Mobile – 09423033619, 08796162691 | Mobile- 09867399870 |
| Email- bs_gadekar@rediffmail.com | Email- vijay249@hotmail.com |

Website- www.jeevanmargdarshan.com

पत्ता- 'जीवनमार्गदर्शन', बझार पेठ, मु. पो. साखरवाडी, तालुका- फलटण, जि. सातारा ४१५५२२

# प्रकरण १

## संशोधन, ग्राफ आणि 'जीवनमार्गदर्शन' सॉफ्टवेअर याबद्दल माहिती.

### १.१ संशोधनाचे स्वरूप आणि विस्तार

१९६५ पासून मी संशोधन सुरु केले. अनेक व्यक्तींकडून या शास्त्राचे प्राचीन आणि अर्वाचीन ग्रंथ, पोथ्या, पुस्तके आदि मिळवून अभ्यास करू लागलो. सुरुवातीपासूनच महत्वाच्या नोंदी करून ठेवण्याचा क्रम ठेवला. माहिती मिळवणे साठी अनेक ज्योतिषांना भेटलो. सद्गुरुंच्या मोठ्या परिवाराचे यासाठी मोठे सहाय्य झाले. विस्तारभयास्तव संशोधनाचा तपशील खाली थोडक्यात दिला आहे.

#### १.१.१ नियम आणि पद्धतींचे संकलन.

आमच्या अभ्यासानुसार शास्त्रात सुमारे ११०० मुख्य नियम आहेत आणि अनेक पद्धती आहेत. १२ राशी, ७ ग्रह, पत्रिकेतील १२ भाव, २७ नक्षत्रे आहेत. या सर्वाना आणि क्रांतिवृत्ताचे ३६० अंश या सर्वांना भिन्न भिन्न कारकत्वे दिली आहेत. या सर्व बाबींचे अनुसंधान घ्यावे लागते. या सर्वांचा मेळ (permutations and combinations) घातला असता साधारणतः ८ ते १० शब्दांचे एक फलितदर्शक वाक्य अशा फलितदर्शक वाक्यांची संख्या (पुनरावृत्ती वगळून) सुमारे ३५०००० होते.

#### १.१.२. जीवनात घडलेल्या घटना आणि त्यांच्या तारखांचा संग्रह जमविला.

ज्योतिष शास्त्रातून घटनांचा बोध हा परिणाम आणि कालनिर्णय या दोन्ही अंगानी व्हायला हवा असा हेतू मी ठेवला होता. कारण घटना कोणती घडेल याचे स्थूल उत्तर अनेकांचे बऱ्यापैकी येतात पण ती केव्हा होईल याचे अचूक

उत्तर ज्योतिषाकडे नसते. यासाठी खालील स्वरूपाचा डाटा जमा केला - व्यक्तीचा जन्म डाटा (ज. ता., वेळ, जन्मठिकाणाचे अक्षांश- रेखांश), आयुष्यातील महत्वाच्या घटना, घटनेची तारीख आणि घटनेची पुढे चांगली का वाईट फळे मिळाली. मी केवळ ४० वर्षे किंवा अधिक वयाच्या व्यक्तींचे रेकॉर्ड जमेस घेतले कारण आयुष्यात घटना घडून त्यांची फळे काय स्वरुपाची मिळाली हे कळण्यास एवढे तरी वय हवे. घटनांमध्ये व्यवसाय- नोकरी सुरु, लग्न, मालमत्ता खरेदी, कर्ज घेतले ते न फिटणे, बेअब्रू, सन्मान, आजार, अपघात अशा तारीख माहीत असलेल्याच इष्ट- अनिष्ट घटना घेतल्या. संशोधनासाठी असा पुरेसा मोठा संग्रह गरजेचा होता. असे ३५००० व्यक्तींचे रेकॉर्ड जमा करायला आणि त्यावर संशोधन प्रक्रिया करायला मला ३० वर्षे लागली.

**१.१.३. प्राचीन नियमांची आजच्या काळातील अचूकता आणि परिणामकारकता ठरविली.**

सर्व नियमांची सध्याच्या काळातील नेमकी फलदातृत्व क्षमता माहीत होणे आवश्यक होते. यासाठी घटनांचे इष्ट- अनिष्ट परिणाम नियमानुसार येतात का हे तपासणे सुरु केले. तसेच घटनेच्या इष्ट- अनिष्ट परिणामानुसारच घटना कालावधीही शुभ- अशुभ होते का हे तपासले. अशा सर्व परिणामांची अचूकता किती टक्केपर्यंत पोचते का हे पाहिले. माझ्या माहितीनुसार असा प्रयोग यापूर्वी कोणी केलेला नसावा, पण तो अत्यावश्यक होता. याची दोन कारणे आहेत- एक म्हणजे प्राचीन काळी सर्व अचूक येत असेल पण आता परिस्थिती व वैचारिक बदलाने येत नसेल तर त्याचा विचार करावा लागेल. कारण जेव्हा नियम बनले तेव्हापेक्षा आताची परिस्थिती खूपच बदलली आहे. दुसरे, पूर्वी कॉम्प्युटर आणि आताची साधने नव्हती. आता संशोधनासाठी कॉम्प्युटर वापरायचा होता आणि कॉम्प्युटरला फक्त आकड्यांची भाषा समजते, म्हणून ही माहिती आकड्यात टक्केवारीतच पाहिजे होते. यासाठी मला स्वत:लाच अनेक कॉम्प्युटर प्रोग्राम बनवावे लागले, कारण कोणाची मदत मिळाली नाही.

**१.१.४. संशोधनासाठी संगणकाचा वापर, त्यासाठी अनेक प्रोग्राम स्वत: तयार केले.**

विविध नियमांचा समन्वय करणे, त्यासाठी गणिते करणे यात खूपच अडचणी होत्या. उदा. घटनेचा दिवस संबंधित विषयासाठी व्यक्तीला शुभ का अशुभ ते शास्त्रानुसार काढावे लागते, (*पंचांगाने नव्हे* ). यासाठी संपूर्ण जन्मपत्रिकेला सर्व नियम लावावे लागतात (जे पंचांग पध्दतीत लावलेले नसतात), दर दिवसाच्या सर्व ग्रहांच्या गोचर स्थितीचे संपूर्ण पत्रीकेशी अनुसंधान साधावे लागते. कॉम्पुटरशिवाय हे शक्यच नाही, कारण असे एका दिवसाचे, एक विषयाचे शुभत्व- अशुभत्व काढायला मनुष्याला आठ तास लागतात, कॉम्प्युटर एक वर्षाचे तेच अनुमान काही सेकंदात काढतो. कॉम्प्युटरला आपण दिलेल्या सूचनांचा अवलंब तो अचूकपणे, तंतोतंत करून उत्तरे अगदी अचूक व अथक पणे, अफाट वेगाने काढतो. हे मानवाला निसर्गत: अशक्य आहे. खरेतर याबाबत मी स्वत:ला भाग्यवान समजेन कारण पूर्वी कॉम्प्युटरसारखे साधनच नव्हते. काय करायचे हे मला माहीत असले तरी कॉम्प्युटरशिवाय मी जे संशोधन केले ते यशस्वी होणे शक्यच नव्हते !

**१.१.५. शास्त्रात विना अधिकार शास्त्रात घुसडली गेलेले नवीन नियम, कारकत्वे वगळली.**

ऋषीनी या शास्त्राची रचना प्रगत योगसाधनेच्या माध्यमातून प्राप्त झालेल्या ज्ञानातून केली असे मानायला प्रत्यवाय नाही, कारण आजही असे अनुभवाला येते आणि सध्या उपलब्ध असलेली वैज्ञानिक साधने पूर्वी नव्हती. पण अशा व्यक्ती आता अति दुर्लभ. गेल्या ३-४ शतकात अनेक नियमांची भर अशा अधिकाराविना झाली आहे, म्हणून असे सर्व नियम वगळले.

उदाहरण- हर्षल, नेपच्यून, प्लुटो या (डोळ्याने न दिसणार्या) ग्रहांचा उल्लेख वेगळ्या नावाने महाभारतात आला आहे, अनेक महत्वाच्या घटनांच्यावेळची त्यांची स्थानेही महाभारतात नमूद करण्यात आली आहेत हे डॉ. प. वि. वर्तक यांनी दाखवून दिले आहे. या वर्णिलेल्या स्थिती आणि या ग्रहांची आता ज्ञात असलेली गति वापरून गणिताने डॉ. वर्तक यांनी त्याचा काळ ५५६० इ.स.पू. असा सिद्ध केला आणि महाभारत प्रत्यक्ष आजपासून सुमारे ७८०० वर्षापूर्वी घडले हे सिद्ध केले. तसेच राहू- केतू हे ग्रह नसून छायाग्रह/ नोडस असल्याचेही ज्ञात होते. हे सर्व ज्ञात असूनही शास्त्रकारानी केवळ रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र आणि शनि या सातच ग्रहांना शास्त्रात स्थान दिले, त्यांना कारकत्वे आदि दिली आहेत ही फार महत्वाची गोष्ट आहे. संशोधनांती माझे मत असे झाले की शास्त्रकारांनी केवळ मानवी डोळ्यांनी दिसणाऱ्या आकाश दर्शनाचाच विचार मानवासाठी केला आहे. जसे मुंगीला तिच्या डोळ्याने दिसणारे जग हे तिच्या मताचे जग होय.

आधुनिक विज्ञानाला हर्षल, नेपच्यून, प्लुटो यांचा शोध गेल्या २००-२५० वर्षात शोध लागला. त्यानंतरच्या काळात अनेक लेखकांनी थोडया थोडया कुंडल्या घेऊन हर्षलादी ग्रहांना विविध राशी, गुण, कारकत्वे बहाल केल्याचे दिसून येते. यामागे योगसाधनेद्वारे प्राप्त झालेले ज्ञान नाही. किंवा विज्ञानपद्धतीने, म्हणजे हजारो केसेस

जमवून त्यांचे विश्लेषण करून नियम आदि ठरविले असेही नाही. याचा अर्थ असा होतो की राहू, केतू, हर्षल, नेपच्यून, प्लुटो यांची कारत्त्वे ही विना अधिकार शास्त्रात घुसडली गेली आहेत. या कारणास्तव आम्हीही प्राचीन शास्त्रात जेवढे नियम, कारकत्वे आहेत तेवढेच वापरले, रवि ते शनि या सातच ग्रहांची दखल घेतली, बाकी सर्व वगळले तेव्हाच अचूकता मिळाली, ही सिध्दताच मानावी.

**१.१.६. शॉर्ट-कट स्वरूपाच्या बर्याच प्रचलित गोष्टीना प्राचीन शास्त्रात आधार आहे का याचा शोध घेतला.**

सध्याच्या वापर पद्धती मधील अनेक गोष्टी, उपाय योजना आदि प्राचीन शास्त्रात नाहीत आणि कोणी त्यांना शास्त्रात आधारही दाखविला नाही. अशा शास्त्रबाह्य गोष्टी या शॉर्टकट होत आणि यांनी चुकामध्ये भर पडते. या बद्दल विस्ताराने पुढे
१.२.८ मध्ये दिले आहे.

**१.१.७. अचूक भविष्य कथन करता येते का, नसल्यास का नाही याचा शोध घेतला.**

संशोधना दरम्यान ज्योतिष शास्त्राबरोबर अध्यात्म तत्वज्ञान आणि विज्ञान यांचाही मागोवा मी घेत होतो. पहिले म्हणजे या शास्त्राचा आधार आणि उगम अध्यात्म तत्वज्ञानात आहे. या तत्वज्ञानाप्रमाणे- ईश्वरी प्रशासन व्यवस्था अशी आहे की प्रत्येक जीवाला त्याच्या चांगल्या- वाईट कर्मांची चांगली- वाईट फळे जन्मजन्मांतरी भोगूनच संपवावी लागतात. या व्यवस्थेला प्रारब्ध असे नाव आहे. प्रत्येक व्यक्तीचे प्रारब्ध भिन्न असते (म्हणून भविष्यही वेगळेच असते) आणि ते कोणाला कळू शकत नाही. जीवनात अनेक घटना प्रारब्धानुसार घडतात, त्यामुळे स्पष्ट होते की व्यक्तीचे अचूक भविष्य कळणे अशक्य आहे. दुसरे, हे शास्त्रकर्ते हे अध्यात्म चांगल्या तर्हेने जाणत होते. शास्त्रातून अचूक भविष्य कळणे म्हणजे वरील ईश्वरी व्यवस्थेत ढवळाढवळ हे ते जाणत होते, त्यामुळे ते असे शास्त्र रचणे अशक्य आहे. नाडीग्रंथातून भविष्य जाणण्यासाठी गेलेल्यांचा अनुभव असा आहे की भूतकाळ अचूक येतो, पुढील भविष्य चुकते. यानेही हेच सिद्ध होते की जाणते समर्थ लोक ईश्वरी व्यवस्थेत हस्तक्षेप करत नाहीत. तिसरे असे की ज्या शास्त्रांचा उगम अध्यात्म तत्वज्ञानात आहे, अशा सर्वच प्राचीन ग्रंथ/शास्त्रांचा उद्देश समाजाला मार्गदर्शन आहे. त्यामुळे या शास्त्राचा उद्देश 'अचूक भविष्य सांगणे' असा असण्याची चूक त्यांच्याकडून अपेक्षित धरता येत नाही. चौथे म्हणजे मी पूर्वी वाचले होते की सध्या जगात दर सेकंदाला एका मानवी बालकाचा जन्म होत आहे. हे वास्तवही दर्शविते की जन्मपत्रिकेवरून अचूक भविष्य कळणे अशक्य आहे. याबाबत सविस्तर १.२.१ मध्ये पहा.

**१.१.८. प्रचलित उपाययोजनांना शास्त्रात काय आधार आहे, हे शोधले.**

अनिष्ट ग्रहयोगाचे परिणाम टाळावेत म्हणून सध्या तांत्रिक विधी, काही संख्येचा मंत्रजप, नारायण नागबळी सारखे अन्य धार्मिक विधी अथवा कर्मकांड, रत्ने, मौल्यवान खडे, विशिष्ट रंग यांचा वापर हे सुचविले जाते. अनेकांना मी विचारले की या उपाययोजनांना शास्त्रात काही आधार आहे का. कोणीही यांना शास्त्रात आधार सांगितला किंवा दाखविला नाही, सर्वांनी सांगितले की, 'रूढीने चालत आले आहे, ते आम्ही सांगतो.' तात्पर्य या उपाय योजनांना प्राचीन आध्यात्मिक शास्त्राधार नाही.

## १.२. संशोधनाचे निष्कर्ष आणि त्याचे आधार-

संशोधनाचे मुख्य निष्कर्ष, त्याचे आधार हे खाली थोडया विस्ताराने दिले आहेत. मुद्दा स्पष्ट होण्यासाठी काही ठिकाणी पुनरुक्ती अपरिहार्यपणे झाली आहे. याचे कारण असे की 'ग्राफिक' सोफ्टवेअर, जीवनमार्गदर्शन पद्धतीतील गाईडलाईन्स यांचा आधार केवळ प्राचीन शास्त्राचे नियम आणि पद्धती, त्यांची आम्हाला मिळालेली सध्याच्या काळातील टक्केवारीतील अचूकता, आणि संशोधनाचे निष्कर्ष हे आहेत.

**१.२.१. जन्मकुंडली हे अचूक भविष्य वर्तविण्याचे साधन होऊच शकत नाही.**

एक कारण म्हणजे या शास्त्राचा विस्तार अफाट आहे. १.१.१ वरुनही याची कल्पना येईल. 'एका योग्याची आत्मकथा' हे योगानंद परमहंस यांचे जगप्रसिध्द आत्मचरित्र आहे. श्री युक्तेश्वर हे त्याचे गुरू होते. 'हे शास्त्र आहे, पण त्याचा पूर्ण अभ्यास करण्यास मानवी जन्मही पुरत नाही' असे श्री युक्तेश्वर यांनी म्हटल्याचे श्री योगानंद यांनी या आत्मचरित्रात नमूद केले आहे. श्री युक्तेश्वर आणि श्री. योगानंद दोघेही मोठ्या योग्यतेचे योगी होते.

दुसरे, वास्तवात सार्वत्रिक अनुभव असाच आहे की जन्मकुंडलीवरून वर्तविलेले भविष्य अचूक येत नाही, मोठ्या प्रमाणात चुकल्याचेच आढळते. अगदी समान कुंडल्या असल्या तरी जीवन भिन्न असते. मी वृत्तपत्रे, नियतकालिके, विविध विषयावरील पुस्तके, टी.व्ही. यातून मिळणाऱ्या विज्ञानविषयक माहिती आणि प्रगतीची नोंद नियमित घेत असतो. मी काही वर्षापूर्वी वाचले होते की जगभरात मिळून सरासरी प्रत्येक सेकंदाला एका बालकाचा जन्म होत आहे, म्हणजे दर दिवशी ८६४००. श्री. विजय म्हैसकर यांनी नंतर Wikipedia वरील जगाची

लोकसंख्या आणि दर हजारी दर वर्षी होणाऱ्या जन्मांची संख्या याच्या आधारे सांगितले की जगभरात मिळून दर दिवशी २,२८,००० बालकांचा जन्म होत आहे.

लग्नबिंदु म्हणजे पूर्वक्षितिजाला चिकटलेला राशीचक्राचा बिंदु. हा दररोज संपूर्ण राशीचक्रातून, म्हणजे १२ राशीतून, २४ तासात भ्रमण करतो. जन्मवेळी पूर्व क्षितिजावर जी राशी असेल तिला लग्नराशी म्हणतात आणि कुंडलीत ती १ ल्या भावात मांडली जाते. दररोज प्रत्येक राशी लग्नस्थानी सरासरी २४/१२= २ तास असते. प्रत्येक २ तासात, म्हणजेच १२ पैकी प्रत्येक लग्नराशीवर सरासरी २२८०००/१२बरोबर १९००० बालकांचा जन्म होतो. दोन तासात चंद्र अंदाजे १ अंश भ्रमण करतो, तर बाकी सर्व ग्रहांचे भ्रमण काही कला किंवा विकला होते. एवढा सूक्ष्म बदल पत्रिका विश्लेषण पद्धतीत पाहत नाहीत. ते शक्य आणि व्यवहार्यही नाही. म्हणजेच दोन तासाच्या अवधीत ग्रहांची स्थाने बदलत नाहीत म्हणून कोणत्याही राशीलग्नावर एका दिवशी जन्मणाऱ्या अशा १९००० जणांची जन्मकुंडली समान असते. पण जगात वास्तवात असा अनुभव येतो की या १९००० जणांची कुंडली समान, पण त्यांच्या जीवनातील लग्न, विवाह, व्यवसाय, संतती, आजार इत्यादि घटना आणि त्यांच्या तारखा वेगवेगळ्या असतात. या वास्तवावरून हे निर्विवादपणे सिद्ध होते की जन्मकुंडली हे अचूक भविष्य वर्तविण्याचे साधन होऊ शकत नाही. अध्यात्म तत्वज्ञानाप्रमाणे याचे कारण हे आहे की प्रत्येकाचे प्रारब्ध भिन्न असते.

### १.२.२. होराशास्त्र हे मूळचे शास्त्र आहे.

प्राचीन ग्रंथांचा मागोवा घेताना असे दिसून आले की होराशास्त्र हे मूळचे शास्त्र आहे. त्याचा हेतू जीवनात व्यक्तीला मार्गदर्शन हा होता. का आणि कसे माहीत नाही, पण होराशास्त्राला काळाच्या ओघात 'फलज्योतिषशास्त्र' असे नाव पडले आणि त्याचा उद्देश 'भविष्य जाणणे' आहे असे मानले जाऊ लागले. अनेक शतकांच्या काळापूर्वी हे केव्हा झाले हे नक्की सांगता येणार नाही. अनेक प्राचीन ग्रंथात उल्लेख आहेत की राजांच्या दरबारी ज्योतिषी असत आणि महत्वाचे कार्य सुरु करण्यासाठी राजाला शुभ मुहूर्त काढून देणे हे त्यांचे काम असे. याचा अर्थ असा होतो की शुभ काळाचे महत्व प्राचीन काळापासून ज्ञात होते. कदाचित असेही असेल की होराशास्त्राच्या नियमानुसार केलेले काही भविष्यात्मक अंदाज खरे ठरले, त्याची समाजात कर्णोपकर्णी प्रसिद्धी होत गेली. मनुष्याला नेहेमीच भविष्यात काय होईल याचे कुतूहल आणि ते जाणण्याची इच्छा असते. या कारणाने 'या शास्त्रातून भविष्य कळते' हा समज पसरला आणि दृढ झाला. होराशास्त्राचे नावही 'फलज्योतिषशास्त्र' असे रूढ झाले. अशी शक्यताही सूचित होते की जसा जसा राजाश्रय लुप्त होऊ लागला, तशी यावर उपजीविका असणाऱ्यानी या समजाला आपल्या स्वार्थासाठी प्रोत्साहन दिले.

### १.२.३. होरा शास्त्राचा नियमाची सत्यता सिद्ध झाली-

<u>होरा शास्त्राचा मुख्य नियम असा आहे</u>- 'जर एखाद्या विषयाची सुरुवात व्यक्तीच्या त्या विषयाच्या अशुभ कालावधीत झाली असेल, तर त्या विषयाची पुढील काळातील फळेही अशुभ, अनिच्छनीय असतात. याविरुद्ध जर विषयाची सुरुवात व्यक्तीच्या त्या विषयाच्या शुभ कालावधीत झाली असेल, तर त्या विषयाची पुढील काळातील फळेही शुभ, इच्छनीय असतात.ओघानेच हवी ती कामे शुभत्वात करणे आणि अशुभत्वात ती कामे टाळणे यातच अर्थ, श्रम व्यर्थ होण्याचे नुकसान वाचत असते'

<u>**महत्वाची नोंद**</u>- येथे एक महत्वाची गोष्ट लक्षात घेणे अत्यावश्यक आहे. <u>**वरील नियमातील शुभ कालावधी म्हणजे पंचांगातील शुभ अशुभ दिवस नव्हेत**. दिवसाचे हे शुभत्व- अशुभत्व व्यक्तीनिष्ठ, विषयवार, शास्त्रानुसार काढावे लागते. यासाठी सर्व संबंधित नियम व्यक्तीच्या जन्मकुंडलीला लावून, सर्व ग्रहांच्या दररोजच्या गोचर स्थितीचे अनुसंधान संपूर्ण पत्रिकेशी घालून आणि शास्त्रातील सर्व संबंधित नियम वापरून हे प्रत्येक दिवसाचे शुभत्व- अशुभत्व ठरवावे लागते</u>. मनुष्याला एक दिवसाचे एका विषयाचे शुभत्व-अशुभत्व हे भिन्न भिन्न लोकांना एकसारखेच असेल असे गृहित धरणे शास्त्रासाठी चुकीचे ठरणार आहे. व्यक्तिनिष्ठ शुभ- अशुभ कालावधी शास्त्रानुसार काढण्यासाठी मला स्वत:ला 'ग्राफिक' सोफ्टवेअर तयार करावे लागले. आधीच उल्लेख केला आहे की ३० वर्षात ३५००० व्यक्तींचा जीवनातील घटना, त्यांच्या तारखा, आणि घटनांचे पुढील परिणाम सुखकारक की दुख:कारक असा संग्रह मी जमा केला होता. या संग्रहातील विविध विषयातील घटनांच्या तारखांची 'ग्राफिक'ने तपासणी केली. त्यातून हे सिद्ध झाले की जेव्हा घटनेचे पुढील परिणाम अनिच्छनीय, असुखदायी (अडचणी, विलंब, नुकसान, मनस्ताप, अपयश) होते, तेव्हा ती तारीख ग्राफच्या अशुभत्वात होती आणि जेव्हा परिणाम इच्छनीय, सुखदायी (अनपेक्षित सहाय्य, लाभ, यश) होते, तेव्हा ती तारीख ग्राफच्या शुभत्वात होती. यामुळे होराशास्त्राचा नियमाची सत्यता सिद्ध झाली. 'ग्राफिक'ची अचूकता ९०% आहे.

### १.२.४. पत्रिका समान असल्या तरी घटनांची तारीख भिन्न असण्याचे कारण प्रत्येकाचे प्रारब्ध भिन्न असते.

प्रत्येकाचे प्रारब्ध भिन्न असते याच कारणाने पत्रिका समान असल्या तरी जीवनात घडणाऱ्या घटना आणि त्यांच्या तारखा प्रत्येकाच्या भिन्न असतात. 'ग्राफिक'च्या तपासणीत घटनेची, विषयाची सुरुवात होण्याची तारीख जशी ग्राफमध्ये शुभ-अशुभ असेल त्याचप्रमाणे घटनेचे, विषयाचे पुढील काळातील परिणाम होते हे सिद्ध झाले. म्हणून घटनेची, किंवा विषय सुरु होण्याची, तारीख ग्राफमध्ये शुभ की अशुभ हे पाहून प्रारब्धाचा रोख कळण्याचा, आणि त्यावरुन अचूक, उपयुक्त मार्गदर्शन मिळवण्याचा मार्ग सापडला. यासाठी घटनेची अथवा विषय सुरु होण्याची तारीख ही फार महत्वाची ठरते. (प्रारब्ध, कर्म आणि होराशास्त्र यांचा परस्परांशी संबंध आहे. कोणाचेही प्रारब्ध कोणालाही कळू शकत नाही. त्याबद्दल पुढे १.३.० मध्ये थोडक्यात लिहिले आहे.)

**१.२.५ फळ दातृत्वाचा अधिकार प्रारब्धाचा आहे, ग्रहांचा नाही. ग्रह हे केवळ संकेत आहेत.**

वरील विवेचनात हे आपोआपच स्पष्ट आणि सिद्धही झाले आहे की प्रत्येकाला त्याच्या प्रारब्धानुसार फळे मिळतात. ग्रह हे केवळ प्रारब्धाचा संकेत ठरतात.

**१.२.६ अनिष्ट ग्रहयोग निवारणाच्या उपाययोजना निरुपयोगी ठरतात.**

वर आपण हे सिद्ध झाल्याचे पाहिले की फल दातृत्वाचा अधिकार ग्रहांकडे नाही, तो अधिकार केवळ प्रारब्धाचा आहे. आता प्रारब्ध हेच केवळ फळ देणारे आहे, ते कोणी जाणूही शकत नाही आणि बदलूही शकत नाही. त्यामुळे पत्रिकेत अनिष्ट ग्रहयोग असला की प्रचलित पद्धतीत ग्रहांच्या अनिष्टतेच्या निवारणासाठी संबंधित ग्रहांचा जप, काही खडे, रत्ने, रंग यांचा वापर, वा अन्य धार्मिक विधी असे जे उपाय म्हणून सुचविले जातात ते आपोआपच निराधार, निरुपयोगी ठरतात. प्राचीन अध्यात्मिक तत्वप्रणाली नुसार या शास्त्रात अशा उपायांना काही आधार नाही. म्हणून जीवनमार्गदर्शन पद्धतीत अशा उपाययोजनाना स्वीकारलेले नाही. आमच्या पध्दतीत काल्पनिक अपेक्षांना त्यागून कर्तृत्वाला प्राधान्य दिले जाते आणि शुभत्वात कामे करणे आणि अशुभत्वात ती करायची टाळून पुढे येणाऱ्या शुभत्वात करणे हीच उपाययोजना आहे.

**१.२.७. या शास्त्राचा हेतू अचूक भविष्य जाणणे हा नसून केवळ मार्गदर्शन हा आहे.**

संशोधनांती हा निष्कर्ष काढला, त्याची खालील कारणे आहेत.

अ) ज्या शास्त्रांचा उगम अध्यात्मिक तत्वज्ञानात आहे, अशा सर्वच शास्त्रांचा हेतू समाजाचे कल्याण आणि मार्गदर्शन हा आहे. याही शास्त्राचा उगम अध्यात्मिक तत्वज्ञानात आहे. या शास्त्राची रचना शास्त्रकारांनी योगसाधनेद्वारे मिळालेल्या ज्ञानाने केली. ते अध्यात्म तत्वज्ञानाचे चांगले जाणकार होते. त्यांना माहीत होते की- ''प्रारब्धव्यवस्था ही ईश्वरप्रणित व्यवस्था आहे. योगसाधने शिवाय सामान्यांना ती कळू शकणार नाही आणि जीवाला त्याने जन्मोजन्मी केलेल्या चांगल्या- वाईट कर्मांची फळे भोगूनच संपवावी लागतात. प्रारब्ध म्हणजे त्या जन्मात भोगावयाची फळे. अचूक भविष्य कथन हे ईश्वरी व्यवस्थेत हस्तक्षेप ठरेल.'' त्यामुळे या शास्त्राची रचना ते अचूक भविष्य जाणणे या हेतूने करतील हे शक्यच नाही. समाजाला अडचणीत मार्गदर्शन व्हावे, प्रारब्ध भोगून संपविताना अडचणीत व्यक्तीला उपयुक्त मार्गदर्शन व्हावे, त्याने अधिक चुका करू नयेत या हेतूने त्यांनी या शास्त्राची रचना केली.

**ब) जन्मपत्रिका हे अचूक भविष्यकथनाचे साधन होऊच शकत नाही.**

जन्मपत्रिका समान असल्या तरी त्या व्यक्तींचे जीवन भिन्न असते हे जगातील वास्तव आहे. त्यामुळे जन्मपत्रिका हे अचूक भविष्यकथनाचे साधन होऊच शकत नाही. आधीचा मुद्दा नं. १.२.१ यात हे अधिक स्पष्ट केले आहे.

होराशास्त्राच्या नियमाप्रमाणे या शास्त्राद्वारे उपयुक्त मार्गदर्शन मात्र मिळते.

**१.२.८ शास्त्रात रूढ असलेल्या अनेक नियम वा प्रथा शास्त्रात नाहीत. ते चुकीचे शोर्टकट आहेत.**

सध्या शास्त्रात रुढ असलेल्या अनेक प्रथांना प्राचीन शास्त्रात आधारही नाही. या शास्त्रात कधी आल्या हे कळत नाही. त्या अचूकपणे अनुभवालाही येत नाहीत. यामुळे त्या चुकीचे शोर्टकट स्वरूपाच्या ठरतात. शास्त्राच्या अफाट विस्तारामुळे हे शोर्टकट आले असतील अशी शक्यता आहे, पण अशा चुकांमुळे शास्त्र बदनाम होते. काही चुकीचे शोर्टकट असे आहेत-

१. पंचांग मुहूर्त/साडेतीन मुहूर्त- भारतात पंचांगात नामकरण, गृहप्रवेश, भूमिपूजन, विवाह अशा विविध कार्यासाठी शुभ मुहूर्त दिलेले असतात. लाभ, यश, सौख्य प्राप्तीसाठी या मुहूर्तावर ही कार्ये करावीत असे समजले जाते, पण वास्तव अनुभव हा आहे की मुहूर्त वापरला तरी असे होण्याची काही खात्री नसते. महत्वाची गोष्ट म्हणजे पंचांग मुहूर्त हे सार्वजनिक स्वरूपाचे असतात. व्यक्तीला ते शुभ की अशुभ हे त्याच्या जन्मकुंडलीचा, संबंधित

विषयाचा विचार करून ठरवावे लागते. बहुतेकांना आणि अनेक ज्योतिषांना हे माहीत नसते असे मला आढळले. कुंडली इ. काहीच माहीत नसले तर पंचांग मुहूर्त ठीक असे माझे मत आहे.

साडेतीन मुहूर्त (विजयादशमी- अर्थात दसरा, गुढी पाडवा, बली प्रतिपदा, अक्षय तृतीया) हे अतिशय शुभ ठरविले आहेत. या दिवशी कोणतेही काम सुरु करायला मुहूर्त पाहण्याची गरज नाही असे समजले जाते. पण यांचीही स्थिती पंचांग मुहूर्तासारखीच आहे. वास्तव अनुभव हा आहे की अशा मुहूर्तावर अनेक दुकाने, व्यवसाय, बांधकामे, संस्था सुरु केले जातात, पण पुढे असे दिसते की त्यातील अनेक चालले नाहीत, नुकसानीत गेले आहेत. या साडेतीन शुभ दिवसांच्या दुसऱ्या दिवसाच्या वर्तमान पत्रात 'अनिष्ट बातम्या कोणत्याही नसतील' असे होणे कदापिही शक्य नाही. यासाठी पंचांग मुहूर्त हे आमच्या मते शोर्टकट आहेत.

२. वधू- वर गुणमेलन कोष्टक- भारतात वधू- वरांची पत्रिका पाहण्यासाठी गुणमेलनाचे कोष्टक पंचांगात दिलेले असते, ते वापरले जाते. यात ३६ पैकी गुण काढले जातात आणि १८ किंवा अधिक गुण जुळले की पत्रिका जुळल्या असे समजले जाते. याचा अभ्यास केला असता असे दिसते की यात दोघांच्या जन्मपत्रिकातील चंद्राच्या राशी आणि नक्षत्रातील स्थानाला फार महत्व दिले गेले आहे. शास्त्राप्रमाणे चंद्र हा विवाहाचा कारक नाही, तो मनाचा कारक आहे. विवाहाचा कारक शुक्र आहे. 'या गुणमेलनाला शास्त्रात काय आधार आहे' असे मी अनेकांना विचारले. कोणीही याला समर्पक आधार दाखविला नाही, हे आम्ही रूढीने वापरतो एवढेच सांगितले. खरेतर लग्नबिंदूच्या गति खालोखाल गतिशील भाग हा चंद्राचा असतो, लग्न दोन तासात तर चंद्र सव्वादोन दिवसात राशी बदलत असतो म्हणून ही पध्दत स्वीकारली गेली आहे, याला शास्त्राधार नाही. महत्वाची आणखी एक गोष्ट म्हणजे या कोष्टकाप्रमाणे पत्रिका जुळल्या तरी संसार सुखाचा होतो याचीही खात्री नाही, कारण अगदी ३६ पैकी ३६ गुण जुळूनही अनेक घटस्फोट झालेले दिसतात. म्हणजे गुणमेलन पद्धती वापरून फायदा होतो अशी खात्री नाही. एकूण हा चुकीचा शोर्टकट ठरते. ही पध्दत उर्वरीत जगांत ९० टक्के वापरली जात नाही आणि यामुळे काही फरक पडतो असे काहीच दिसत नाही.

शास्त्रात यासाठी सुचविलेली पद्धती आहे ती म्हणजे ग्रहमेलन पद्धती. सामान्य लोकच काय, अनेक ज्योतिषानाही ही पद्धत माहिती नव्हती असे दिसून आले. या प्राचीन पद्धतीत दोन्हीही पत्रिकातील १ आणि ७ भावाचे अधिपती, रवि, शुक्र, मंगळ, शनि आदि ग्रहांचे एकमेकांच्या पत्रिकात काय योग होतात याचा विचार केला आहे. त्यासाठी ज्योतिषशास्त्राला धरुन बरेच नियम आहेत. ग्रहमेलन पद्धतीत दोघांच्या अंशात्मक कुंडल्या बनविणे, शास्त्रनियम वापरणे आणि निष्कर्ष काढणे इ. बरेच काम करावे लागते आणि त्याला बराच वेळही लागतो. या कारणाने हा गुणमेलन कोष्टकाचा (शास्त्रबाह्य) शॉर्ट कट आला असण्याची शक्यता आहे. ग्रहमेलन पद्धतीची अचूकता किती हे संशोधनाने ठरवावे लागेल. आमच्या अनुभवाप्रमाणे याची अचूकता फार कमी आहे. ग्रहमेलनाचा अवघड अभ्यासापेक्षा उभे आडवे कोष्टक सोपे म्हणून ही पध्दत प्रचलित झाली.

३. सध्याच्या काळी राहूकाल, पत्रिकेतील मंगळ, कालसर्प योग आणि त्याचे प्रकार यांची अनिष्ट फळे, त्यावरील नारायण नागबळी, त्रिपिंडी श्राद्ध याच्याविषयी बरेच लिखाण येत असते. परंतु कालसर्प योगाचा प्राचीन शास्त्रात उल्लेख मला सापडला नाही, अनेकांना विचारले पण कोणी काही आधार दाखविला नाही. कालसर्प योगावरील लिखाण गेल्या ३०-४० वर्षातलेच दिसते, बरेचसे लिखाण 'हा योग फार अनिष्ट आहे' अशा प्रचार स्वरूपाचे असते. अनिष्टतेचा बागुलबोवा निर्माण केला गेला आहे असे वाटण्यासारखी स्थिती आहे. या योगांची अनिष्टता कोणी विज्ञान तऱ्हेच्या संशोधनाने सिद्धतेसह मांडलेली नाही. म्हणून जाणकारांना ते अविश्वसनीय वाटते.

४. तसेच वास्तूतील दोष, दक्षिणेला दरवाजा असण्याची अनिष्टता इ. आणि त्यावरील उपाय याबद्दल मोठ्या प्रमाणात लिहिले जात आहे. हजारो केसेस जमा करून यांची अनिष्टता, तसेच यावरील उपायांची उपयुक्तताही कोणी सिद्ध केलेली नाही. एकाच वास्तूत एकाला अडचणी येतात, नुकसान होते तर दुसऱ्याला त्याच वस्तूत सुख मिळते असे दिसते. माझ्या मते स्वत:च्या कर्तृत्वातील त्रुटी, आणि प्रत्येकाचे प्रारब्ध भिन्न असणे ही याची खरी कारणे ठरतात.

'ग्राफिक' सोफ्टवेअर आणि जीवनमार्गदर्शन पद्धतीमध्ये असे शास्त्रात आधार नसलेले सर्व नियम, शोर्टकट्स आम्ही वगळले. केवळ प्राचीन शास्त्रातील नियम आणि पद्धतींचाच वापर केला.

### १.३. प्रारब्ध, कर्म आणि होराशास्त्र.

भारतीय तत्वज्ञानात जीवनातील घटनांच्या कार्य- कारण भावाचा विचार केवळ भौतिक अंगाने केलेला नाही. भारतीय तत्वज्ञानात प्रारब्ध, कर्म, पुनर्जन्म या अत्यंत महत्वाच्या, मूलभूत संकल्पना आहेत. यावर स्वतंत्र ग्रंथ

लिहिता येतील. त्यांचा एकमेकाशी जवळचा संबंध येतो आणि त्या या शास्त्राचा अंगभूत भाग आहेत . शास्त्राची चांगली जाण आणि त्याबद्दल योग्य दृष्टीकोन यासाठी या कल्पनांची थोडी तरी ओळख जरूर आहे. म्हणून आपण या अगदी त्रोटकपणे पाहणार आहोत. भारतीय तत्वज्ञानात अशी मान्यता आहे की- 'जीवनातील घटना अकारण आणि अवेळी घडत नसतात. त्यात प्रारब्धाचा भाग असतो.' जगातील अन्य देशात प्रारब्धासारख्याच लक, डेस्टिनी, नसीब अशा संकल्पना रुढ आहेत असे आपल्याला दिसते.

### १.३.१ प्रारब्ध

प्रारब्ध ही कल्पना आकलन होण्यास कठिण आहे. त्याची चर्चा केवळ ऋषि- मुनींनी लिहिलेल्या तत्वज्ञानावरील प्राचीन ग्रंथांच्या आधारेच होऊ शकते. अगदी सोप्या शब्दात ही कल्पना अशी आहे- जीव हा परब्रह्माचा, वैश्विक चैतन्याचा, अति छोटा अंश असून तो भौतिक सृष्टीचा भाग असलेल्या पार्थिव शरीरात निवास करत असतो. जीवाच्या अस्तित्वामुळेच शरीर सचेत आहे असे भासते. जीव हा त्या शरीराशी एकरूप होतो आणि शरीराची सुख- दु:खे, शरीराने केलेली बरी वाईट कर्मे स्वत:ची समजू लागतो. त्यामुळे वस्तुत: जी त्याची नाहीत, अशा कर्मांची बरी- वाईट फळे भोगणे त्याला प्राप्त होते आणि त्यासाठी त्याला अनेक जन्म घेणे चालू राहते. प्रत्येक जन्मात काही कर्मांची फळे भोगून होतात तर काही नवीन कर्मांची भर पडते. हे रहाटगाडगे सुरु राहते.

अगदी ढोबळपणे म्हणायचे तर कर्मांच्या साठयाला संचित म्हटले जाते आणि त्याचा चालू जन्मात जो भाग भोगायचा असतो त्याला प्रारब्ध म्हटले जाते. प्रारब्ध ही ईश्वराच्या सृष्टी नियमन व्यवस्थेचा भाग आहे. जीवाची कर्मे जशी बरी- वाईट तशी त्यांची फळेही बरी- वाईट असतात आणि ती त्या जीवाला भोगूनच संपवावी लागतात. कोणाचेही प्रारब्ध कोणालाही समजू शकत नाही. ते ज्याचे त्याला भोगूनच संपवावे लागते. दु:खाचे कारण शोधताना सायन्सवाद्यांनाही ही तत्वे मान्य होण्यासारखी आहेत.

### १.३.२ कर्म

कर्म म्हणजे कृति हा सर्वसाधारण अर्थ आहे. परंतु प्रारब्ध या कल्पनेच्या संदर्भात 'कर्म' याला एक विशिष्ट अर्थ आहे. मानवासह सर्वच प्राणी आहार, निद्रा, भय आणि मैथुन या नैसर्गिक प्रेरणांमुळे अनेक कर्मे करत असतात. परंतु प्राण्यांची आणि मानवांची कर्मे यात एक महत्वाचा फरक असतो. मानवेतर प्राण्यांची सर्व कर्मे ही केवळ निसर्गप्रेरणानी होत असतात. फक्त मानवाला मात्र 'बुद्धी' ही देणगी लाभली आहे. या बुद्धीच्या जोरावर परोपकार, स्वार्थ अशा इतर चांगल्या- वाईट हेतूने माणसे मदत करणे, दान करणे, लुटणे, चोरी-मारी, फसवणे अशा अनेक क्रिया करत असतात. या सहेतुक क्रियांना प्रारब्धाच्या संदर्भात 'कर्म' असे म्हटले जाते. प्रारब्ध व्यवस्थेत चांगल्या कर्माला चांगले फल तर वाईट कर्माला वाईट फळ दिले जात असते. हेतू हा की मनुष्याने चांगले काय, वाईट काय हे समजून घ्यावे आणि त्याप्रमाणे स्वत:चे कर्म सुधारत जावे.

### १.३.३ जीवनात प्रारब्ध आणि कर्म यांचे स्थान.

काहींचा समज असतो की जीवनात सर्व काही फक्त प्रारब्धाने घडते, आपल्या हातात काहीच नसते. उलट काहीना असे वाटते की जीवनात जे काही मी प्राप्त केले ते केवळ माझ्या कर्तृत्वानेच, प्रारब्ध वगैरे काही नाही. हे दोन्हीही गैरसमज आहेत. ईश्वराने प्रत्येकाला काही क्षमता आणि कर्म करण्याचे स्वातंत्र्य बहाल केले आहे. प्रारब्ध आणि स्वत:चे कर्म दोन्ही मिळून जीवन घडते. श्रीराम, श्रीकृष्ण, हनुमान यांनी कर्म करत राहण्याचा आदर्श ठेवला आहे. संत रामदास यांनी क्षमतेनुसार कर्म करण्यावरच भर दिला आहे. माझे सद्गुरू सांगत की 'प्रारब्धाचा भाग जीवनात एक तृतीयांश इतकाच असतो.' परंतु जीवनात घडलेल्या कोणत्याही घटनेची कारणे भोवतालच्या परिस्थितीत सापडतील अशी ईश्वरी व्यवस्था असते. त्यामुळे अमुक घटना प्रारब्धामुळे घडली असे सिद्ध करता येत नाही. यालाच 'ईश्वर करून सवरून नामानिराळा असतो' असे म्हणतात. तरीही जीवनात काही अचानकपणे घडते, त्यामागे प्रारब्ध असू शकते. उदा. अचानक सहाय्य मिळणे, अनपेक्षित अडथळा येणे, अचानकपणे एखादी गोष्ट करण्याची (अगर न करण्याची) मनाने ओढ घेणे इत्यादि.

### १.३.४ होराशास्त्र

प्रपंचात सामान्य जनाना अनेक अडचणीना, दु:खाना सामोरे जावे लागते, अशा वेळी सामान्य माणसाच्या हातून आणखी चुकीची कर्मे घडू शकतात याबद्दल ऋषि- मुनीना कणव होती. ज्ञानी ऋषींना योगसाधनेतून जीवनात घडणारी घटना, त्यावेळची आकाशातील ग्रहस्थिती आणि घटनेचे पुढील काळातील परिणाम यातील संबंधांचे ज्ञान प्राप्त झाले. त्यांनी जाणले की व्यक्तीच्या जीवनात अशुभ घटना घडते, तेव्हा त्याला त्या विषयाला अशुभ ग्रहमान असते, उलट शुभ घटना घडते तेव्हा शुभ ग्रहमान असते. हा मुख्य नियम, इतर अनेक ग्रहयोगांचे नियम, विविध कारकत्वे यांचे ज्ञान, त्यांना प्राप्त झालेले इतर अनेक नियम यावरून सर्वसामान्याना मार्गदर्शन

मिळावे म्हणून त्यांनी होराशास्त्राची रचना केली, यातून 'अचूक भविष्य कळावे' म्हणून नव्हे कारण हा ईश्वरी व्यवस्थेत हस्तक्षेप ठरला असता आणि असे ते कधीच करणार नाहीत. त्यांना माहीत होते की कोणाचे प्रारब्ध कोणालाही कळू शकत नाही.

### १.३.५ प्रारब्ध हे फल देण्यात स्वावलंबी नाही.

वर उल्लेखिल्याप्रमाणे घटना घडण्याच्या दिवशीची ग्रहस्थिती आणि पुढील काळात घटनेपासून मिळणाऱ्या प्रारब्धीय फळांचे स्वरूप यातील संबंध ज्ञानी ऋषींना ज्ञात झालाय तो म्हणजे 'जीवनात अशुभ घटना घडते (ज्या घटनेची पुढील काळातील प्रारब्धीय फळे दु:खदायी असतात ती घटना अशुभ), त्यादिवशीचे ग्रहमान व्यक्तीला त्या विषयाला अशुभ असते, उलट शुभ घटना घडते तेव्हा शुभ ग्रहमान असते'. तसेच कोणाचेही प्रारब्ध कोणालाही कळू शकत नाही. म्हणजेच कोणतेही फल व्यक्तीला देण्यासाठी प्रारब्धाला दोन गोष्टीवर अवलंबून राहावे लागते- एक म्हणजे जसे शुभ- अशुभ फल द्यायचे असेल, त्याप्रमाणे त्या व्यक्तीला त्या विषयात त्यानुसारचे शुभ- अशुभ ग्रहमान त्या दिवशी असले पाहिजे. दुसरे असे की त्या व्यक्तीभोवती सुयोग्य परिस्थिती हवी की त्या घटनेची कारणे त्याच्या परिस्थितीत दाखवता येतील. या दोन्ही गोष्टी एकदम उपलब्ध होईपर्यंत प्रारब्धाला थांबावे लागते. यावरुन हे दिसून येते की प्रारब्ध हे फल देण्यात स्वत: स्वावलंबी नसते.

### १.४ प्रचलित पद्धतीवरील आक्षेप, त्रुटी आणि त्यांचे 'जीवनमार्गदर्शन' पद्धतीत केलेले निराकरण-

आजवर अनेक लोकांनी, जाणकारांनी व टीकाकारानी फलज्योतिष पद्धतीवर पुष्कळ आक्षेप घेतले आणि अनेक त्रुटी दाखविल्या आहेत. त्यांचे 'जीवनमार्गदर्शन' पद्धतीत (संक्षिप्ततेसाठी JMD) कसे निराकरण केले त्याचे विवरण पुढे दिले आहे. सामान्यत: ज्योतिषी हे विज्ञानाला अगर विरोधकांना उत्तर देताना धार्मिकतेचा आधार घेतात आणि ज्योतिषशास्त्राच्या नियम आणि वापर पध्दतीचा आधार घेउन त्यावर आपले विचार मांडत असतात. यात खरे तर विरोधकांचा आक्षेप हा मुळात ज्योतिषशास्त्र पध्दती आणि धार्मिकतेचा आधार घेण्यावरच असल्याने अशी कितीही उत्तरे दिली तरी विरोधकांचे समाधान कधीच होत नाही. आम्ही येथे जी उत्तरे दिली आहेत ती विज्ञानाच्या अभ्यासानुसार आणि अध्यात्मिक तत्वप्रणालीच्या (धार्मिक नव्हे ) आधाराने असल्याने ही उत्तरे बहुतेक सर्व विद्वानांनी व विज्ञानाचा अभ्यास असणारांनी स्वीकारली आहेत तीच खुलासेवार पुढे मांडलेली आहेत.

**१.४.१ आक्षेप**- सर्वात मुख्य आक्षेप आहे की 'या शास्त्रातून अचूक भविष्य कळते' असे ठामपणे म्हणत असता, ते अनुभवाला येत नाही. का?

JMD मध्ये- आमच्याही मते 'या शास्त्रातून अचूक भविष्य कळते' हा समज चुकीचा आहे. संशोधनात अध्यात्म, ज्योतिष आणि वास्तव या तीनही अंगानी विचार करून हा निष्कर्ष काढला आहे. १.२.७ पहा. ('भविष्य कळते' हे सिद्ध न करता तसे म्हणणे यामागे शास्त्र बाजूला ठेवून व्यक्तिचे महत्व वाढविण्याचा हेतू असल्याचे वाटते.) पण 'ग्राफिक' सोफ्टवेअर आणि होराशास्त्र यांच्या संयोगाने ९०% अचूक व उपयुक्त मार्गदर्शन होते.

**१.४.२ आक्षेप**- वास्तवात असे दिसून येते की समान जन्मकुंडली असली तरी जीवनातील घटना भिन्न असतात, पण सर्व प्रश्नांसाठी व्यक्तीच्या एकाच जन्मकुंडलीचा विचार केला जातो ही मोठी चूक दिसते.

JMD मध्ये- जीवनमार्गदर्शन मध्ये केवळ जन्मकुंडलीचा विचार नाही, व्यक्तीच्या जीवनातील घटनांच्या तारखांना अतिशय महत्व आहे, कारण या तारखा व्यक्तीच्या प्रारब्धाचा रोख दर्शवितात. प्रत्येकाचे प्रारब्ध भिन्न असते आणि ते कोणालाही कळू शकत नाही. यापूर्वी १.२.१ आणि १.२.४ मध्ये याविषयी आले आहेच.

**१.४.३ आक्षेप**- ज्योतिषशास्त्राचे नियम दीड-दोन हजार वर्षांपूर्वी बनले असे म्हणतात. सध्याच्या प्रचंड बदललेल्या काळात ते अचूकपणे लागू पडताना दिसत नाहीत. पण तेच नियम तसेच वापरतात हे चुकीचे नाही का?

JMD मध्ये- हा आक्षेप योग्यच आहे. आम्ही यापूर्वी उल्लेख केल्याप्रमाणे (१.१.३ आणि १.२.३ पहा) ३५००० व्यक्तींच्या जीवनातील विविध विषयांच्या घटना, घटनांच्या तारखा जमविल्या आणि त्यावरुन प्राचीन नियमांची सध्याच्या काळातील अचूकता टक्केवारीत काढली, कारण कॉम्प्युटरला सर्व गोष्टी आकडयात लागतात. येथे घटनेच्या पुढील मिळालेल्या फळांचे चांगले- वाईट हे स्वरूप बदलायचे नव्हते, पण नियमाची सध्याच्या काळातील परिणाम कारकता काढणे जरुरीचे होते. 'ग्राफिक' सोफ्टवेअरचे निर्णय ९० टक्के अचूक येण्यात याचा मोठा वाटा आहे.

**१.४.४ आक्षेप**- प्रचलित पद्धतीमध्ये अशी स्थिती आहे- भविष्य कोणी लेखी देत नाही, एकाच प्रश्नाचे दहा ज्योतिषांचे भविष्य वेगवेगळे असते, प्रत्येकजण 'मी वापरतो ती पद्धत बरोबर, इतर चूक' असे म्हणतो. ज्योतिषाला स्वत:लाच खात्री नसते हेच यावरून दिसते, मग याचा काय उपयोग?

JMD मध्ये- आमच्या पद्धतीत ग्राफ जे दाखवेल त्याचाच रिपोर्ट लेखी छापून किंवा लिहून दिला जातो, कारण ग्राफच्या अचूकतेची खात्री असते. दिलेली माहिती आणि ग्राफचा कालावधी एकच असेल तर कोणीही, केव्हाही

काढलेला ग्राफ तोच असतो आणि प्रश्नकर्ताही तो पाहू शकतो. व्यक्तिगत मत सांगण्याची यात कोणालाही संधी नाही.

**१.४.५ आक्षेप-** एकाच अडचणीवर सांगितलेल्या उपाययोजना (उदा. खडे, रत्ने, धार्मिक विधी) समान नसतात. वेगवेगळ्या असतात, उपाययोजनांचा प्रश्नाशी अर्थाअर्थी काही संबंधही दिसत नाही. एकूण या उपाययोजना म्हणजे लोकांच्या विश्वासाचा गैर फायदा घेणे आहे असे दिसते.

JMD मध्ये- जीवनमार्गदर्शन मध्ये आम्ही खडे, रत्ने, धार्मिक विधी इ. सारख्या कोणत्याही उपाययोजना सांगत नाही कारण प्राचीन शास्त्रात त्यांना काहीही आधार नाही. प्रश्नाचे विश्लेषण ही ग्राफने केले जाते आणि अडचणीवर उपाययोजनाही ग्राफच आहे. विषयाच्या सुरुवातीच्या तारखेला ग्राफमध्ये अशुभत्व हे त्या विषयात प्रारब्धाची प्रतिकूलता दर्शवते. अशा विषयातील महत्वाची कामे ग्राफच्या शुभ कालावधीत करणे आणि अशुभत्वात ती करायचे टाळणे हीच जीवनमार्गदर्शन मधील उपाययोजना असते. याला विज्ञानाचाही विरोध नाही.

**१.४.६ आक्षेप-** काही पत्रिकात अत्यंत ढोबळ माहिती दिली जाते. उदा. जन्मवेळ अगदी अंदाजित म्हणजे पहाटे, संध्याकाळी, दुपारी इतकेच देणे, लग्नभाव आणि ग्रह यांच्या फक्त राशीच देणे. दुसर्या टोकाला अति सूक्ष्मतेवर भर दिसतो- उदा. जन्मवेळ अगदी सेकंदापर्यंत, लग्न आणि इतर भावारंभ, ग्रहांचे स्थान हे अगदी मिनिट- सेकंदापर्यंत हवे असे म्हणतात, दशाविचार अगदी प्राणदशा पर्यंत केलेला असतो. याने माहितीची अचूकता नेमकी किती हवी याबाबत संभ्रम निर्माण होतो.

JMD मध्ये- ही दोन्ही टोके बरोबर नाहीत. आमच्या मते अतिसूक्ष्मतेवरील भर अनाठायी आहे. कारण असे की ज्या काळात शास्त्राची रचना झाली, त्या काळातील उपलब्ध साधने लक्षात घेवून शास्त्र रचले गेले. वेळ मिनिट- सेकंदापर्यंत मोजायची साधने तेव्हा नव्हती. आता केवळ अशी साधने सहज सर्वत्र उपलब्ध आहेत म्हणून अतिसूक्ष्मतेचा आग्रह चुकीचा ठरतो. पण जन्मवेळ नोंदीत काही मिनिटाहून फरकही नसावा, नाहीतर लग्नराशी बदलून पूर्ण पत्रिका बदलून चूक होते.

काही चुका अनवधानानेही होतात. उदा. विंशोत्तरी दशेचा उदय झाला तेव्हा १ वर्ष ३६० दिवस (१ वर्ष-१२ महीने, १ महिना- ३० दिवस) असे मोजमाप होते. सध्या १ वर्ष- ३६५.२५ दिवस आहे आणि विंशोत्तरी दशेसाठी हे वापरण्याने चूक होत असते. माझा अनुभव सांगतो- जेव्हा मी १ वर्ष- ३६५.२५ दिवस घेत होतो, तेव्हा अचूकता ६० टक्के पर्यंत घसरत होती. जेव्हा १ वर्ष- ३६० दिवस घेतले तेव्हाच अचूकता ९०% पर्यंत गेली. या पध्दतीलाच आम्ही विज्ञाननिष्ठ पध्दत म्हणतो.

**१.४.७ आक्षेप-** 'प्रारब्ध आणि प्रयत्न, कर्म मिळून जीवन घडत असते' असे धार्मिकतेच्या प्रभावासाठी सांगितले जाते, पण बहुतेक वर्तविलेल्या भविष्यात ना प्रारब्धाचा काही उल्लेख असतो, ना व्यक्तीचे प्रयत्न आणि क्षमता यांचाही काही विचार केलेला दिसत नाही. उपाययोजनातही प्रयत्न आणि क्षमता यांना काही स्थान दिसत नाही हे मुळीच पटत नाही.

JMD **मध्ये**- प्रत्येकाच्या जीवनात प्रारब्धाचा भाग असतो. (पहा १.२.१). पण परमेश्वराने व्यक्तीला काही कर्म करण्याची क्षमता आणि स्वातंत्र्य् दिलेले असते आणि त्यांचा भाग अधिक मोठा असतो. सर्व काही प्रारब्धावर टाकून आपण हताश होऊन हात बांधून बसणे हे चुकीचे असते. व्यक्तीने बेपर्वाई, आळस केला तर ही त्याची चूक होय आणि त्याची फळे त्याला भोगावी लागणे हे त्याच्या कर्माचे फळ होय, त्यात प्रारब्धाचा दोष नाही. प्रारब्धीय फळाच्या स्वरूपाबाबत प्रारब्धाचा इरादा 'ग्राफिक'च्या सहाय्याने ९०% अचूकतेने कळतो.

मार्गदर्शन देण्यासाठी आम्ही 'कोष्टाष्टक' पद्धती वापरतो. (याबद्दल अधिक माहिती सोफ्टवेअर बरोबर दिली जाते.) यात व्यक्तीने आपल्या कुवतीप्रमाणे प्रयत्न केले आहेत का नाही याची चौकशी विषयानुरूप प्रश्न विचारून केली जाते. त्या विषयातील प्रारब्धाची कायम दिशा ही विषयाची सुरुवात होण्याची तारीख ग्राफमध्ये शुभ आहे का अशुभ यावरून कळते. अशुभ असेल तरी त्याला स्वत: प्रयत्न करायला प्रोत्साहित केले जाते, त्यातील महत्वाच्या गोष्टी करण्यासाठी शुभ कालावधी दिले जातात आणि कर्तृत्वाने फल प्राप्त करण्यासाठी प्रवृत्त केले जाते. हीच जीवनमार्गदर्शन पद्धतीतील उपाययोजना असते.

**१.४.८ आक्षेप-** भविष्यकथनाची कोणतीही पद्धत ज्योतिषी वापरत असो, भविष्यकथनातील कालनिर्णय मोठ्या प्रमाणात चुकलेलेच दिसतात.

JMD मध्ये- संशोधन करत असताना माझ्या ध्यानात आले की कालनिर्णयाबाबत शास्त्रात फारसे काही उपलब्ध नाही. शास्त्रातील कालनिर्णयाच्या अष्टोत्तरी, विंशोत्तरी अनेक दशापद्धती म्हणजे 'एक समाधानकारक नाही म्हणून दुसरी निघाली' याचे ते द्योतक दिसते. कालनिर्णयासाठी शास्त्रात संपूर्ण पत्रिकेशी दररोजच्या सर्व गोचर ग्रहांचे अनुसंधान करायला सांगितले आहे. कॉम्प्युटरशिवाय हे अत्यंत अवघड आहे. शेकडो जणांशी कालनिर्णया

बाबत केलेल्या चर्चेत हे दिसून आले की बहुतेकांना हे माहीतच नव्हते, 'माहीत आहे' म्हणणार्यांना हे नेमके कसे करायचे याची माहिती नव्हती. याचा दोष सर्वस्वी ज्योतिषांचा नाही, कारण १९९० पर्यंत कॉम्प्युटर सारखे साधनच उपलब्ध नव्हते.

जीवनमार्गदर्शन मध्ये कालनिर्णयाचा अर्थ 'कालावधी शुभ की अशुभ' असा आहे. 'घटना अमुक काळात घडेल' असा भविष्यात्मक नाही. सुरुवातीपासूनच कालनिर्णयासाठी मी दर दिवसाच्या सर्व गोचर ग्रहांचे अनुसंधान जन्मपत्रिकेतील सर्व ग्रहांशी घालायला सुरुवात केली आणि त्यासाठी ग्राफ पद्धतीची योजना केली पण त्याला इतकी वर्षे लागतील असे मात्र मला वाटले नव्हते. सगळ्याचा सारांश आणि निष्कर्ष असा आहे की कालनिर्णयासाठी 'रोजची गोचर ग्रहांची स्थिती' हे एकच साधन आहे.

### १.५. ग्राफ आणि 'ग्राफिक' सोफ्टवेअर-

**विशेष नोंद** - आधीच्या लेखात 'ग्राफिक' सॉफटवेअर असा उल्लेख रुळला असल्याने तसाच वापरला आहे. याचे अधिकृत नाव 'जीवनमार्गदर्शन' सॉफटवेअर असून त्याला ट्रेडमार्क मिळालेला आहे.

ग्राफिक सोफ्टवेअर हे बाजारात उपलब्ध असणाऱ्या इतर ज्योतिष सोफ्टवेअरपेक्षा पूर्ण वेगळे आहे. इतर ज्योतिष सॉफ्टवेअर ही जन्मकुंडली, इतर प्रकारच्या कुंडली, दशासाधन, गोचर ग्रह स्थिती इ.साठी लागणारे गणित करून या गोष्टी जलद काढतात आणि ज्योतिषाला सहाय्य करतात. पण यावरून निर्णय घेण्यासाठी ज्योतिषी हा मध्यस्थ असतो. त्याचा अभ्यास, मते, स्मरण, अनुभव याप्रमाणे तो घटना आणि काळाचे व्यक्तिनिष्ठच भविष्य वर्तवितो त्यामुळे, अपरिहार्यपणे, वर्तविलेले भविष्य हे त्याचे व्यक्तिगत मत ठरते. याच कारणाने एकाच प्रश्नाची दहा ज्योतिषांची दहा उत्तरे येतात. सार्वत्रिक अनुभव असा की अगदी थोडया ज्योतिषांचे निर्णय, तेही काहीवेळाच, बरोबर येतात यामुळे ज्योतिषाचा निर्णय अचूक असण्याची खात्री नसते. तीच गोष्ट उपाययोजनांची आहे.

'ग्राफिक' सोफ्टवेअर मध्ये कुंडली तयार केली जाते, दर दिवसाच्या गोचर ग्रहांचे पूर्ण कुंडलीशी अनुसंधान साधले जाते, आणि शास्त्रानुसार प्रत्येक दिवस व्यक्तीला संबंधित विषयासाठी शुभ आहे की अशुभ आहे हे ठरवले जाते. (हे शुभत्व- अशुभत्व पंचांगातील नव्हे.) याची काही माहिती ती थोडक्यात, एकत्र पाहू.

### १.५.१ 'ग्राफिक' सोफ्टवेअरचा आधार-

'ग्राफिक' सोफ्टवेअर हे सर्वस्वी प्राचीन शास्त्रावर आधारलेले आहे. केवळ प्राचीन शास्त्राप्रमाणे खालील गोष्टी घेतल्या आहेत- १) प्राचीन शास्त्रातील सर्व नियम आणि पद्धती, त्यांची सध्याच्या काळातील संशोधनाने काढलेली टक्के परिणामकारकता, २) प्राचीन शास्त्राप्रमाणे रवि ते शनि हे सात ग्रहच विचारात घेतले आहेत. शास्त्रात आधार नसलेले नियम, कारकत्वे, अन्य शोर्टकट वगळले आहेत. ३) कुंडलीचे १२ भाव, १२ राशी, ७ ग्रह, २७ नक्षत्रे, राशीचक्राचे ३६० अंश या सर्वांना प्राचीन शास्त्रात दिलेली कारकत्वे, त्यांच्या परम्युटेशन- कॉम्बिनेशन यांनी त्यापासून (पुनरावृत्ती वगळून) तयार होणारी अंदाजे ३५०००० फलदर्शक वाक्ये. ४) विंशोत्तरी दशा इत्यादि. लक्षात ठेवणे/आठवणे व शास्त्र वापरणे हे काम कॉम्पुटरवर सोपवले आहे. 'ग्राफिक' मध्ये ४३ विषय आहेत. त्यांना नंबर दिले आहेत. व्यक्तीच्या कोणत्याही प्रश्नाचे उत्तर यातील एक वा अधिक विषयांचा विचार करून काढता येते.

### १.५.२ 'ग्राफिक' सोफ्टवेअर पासून मार्गदर्शन मिळविण्यासाठी लागणारी माहिती-

पहिला भाग म्हणजे ग्राफ तयार होण्यासाठी आवश्यक असणारी माहिती. व्यक्तीचा जन्म तपशील- म्हणजे जन्मतारीख, जन्मवेळ, जन्मवेळेचे GMT अंतर, जन्मठिकाण (अक्षांश- रेखांश), विषयाचा नंबर, ग्राफची सुरुवातीचा महिना आणि वर्ष. ही माहिती दिल्यावरच ग्राफ तयार होतो. दुसरा भाग म्हणजे प्रश्नाचा विषय काय आहे ते पहावे लागते. विषयानुरूप कोणते ग्राफ काढायचे ते ठरवावे लागते. तिसरा भाग म्हणजे प्रश्न अथवा विषय सुरु झाल्याची तारीख, त्यातील महत्वाच्या घटनांच्या तारखा. उदा. व्यवसाया संबंधी प्रश्न असेल तर तो सुरु केल्याची तारीख. मालमत्तेबद्दल प्रश्न असेल तर त्याची मालकी मिळाल्याची तारीख. या तारखावरून ग्राफच्या सुरुवातीचा महिना एक महिना तरी आधीचा घ्यावा लागतो. या तारखा ग्राफमध्ये शुभ आहेत की अशुभ, यानुसार त्या विषयात प्रारब्धाचा रोख सुखदायी अथवा दु:खदायी फळे देण्याचा असतो आणि त्यानुसार त्या विषयात मार्गदर्शन देता येते. दुसरा आणि तिसरा भाग यातील माहिती व्यक्तीशी चर्चा करून मिळवायची असते. ग्राफिकची अचूकता ९०टक्के आहे.

### १.५.३ 'ग्राफ' म्हणजे काय.

वरील भाग १ मधील माहिती दिल्यावर खालील गोष्टी होतात- व्यक्तीच्या जन्मविषयक तपशील दिला की त्याची जन्मकुंडली तयार होऊन ती स्क्रीनवर दिसते. नंतर ग्राफचा विषयक्रमांक आणि सुरुवातीची तारीख दिली की बारा महिन्याच्या प्रत्येक दिवसाच्या सर्व गोचर ग्रहांचे अनुसंधान संपूर्ण पत्रिकेशी घालून, शास्त्राचे विषयाशी संबंधित सर्व नियम लावून प्रत्येक दिवसाचे शुभत्व- अशुभत्व ठरविले जाते. *हे काळाचे शुभत्व अशुभत्व दाखविणारा आलेख म्हणजेच ग्राफ.*

### १.५.४ ग्राफ कसा तयार होतो.

व्यक्तीच्या संपूर्ण जन्मपत्रिकेशी प्रत्येक दिवसाच्या सर्व गोचरग्रहांचे अनुसंधान साधून, शास्त्राचे विषयाशी संबंधित सर्व नियम आणि पद्धती लावून गुण दिले जातात. या गुणांची बेरीज केली जाते, ती एकूण २०० पैकी असते, १०० हा मध्य असतो. दिवसाच्या गुणांची बेरीज १०० च्या वर असेल तर तो दिवस (गुणांची बेरीज वजा १००) इतक्या गुणांनी शुभ असतो. उदा. गुणांची बेरीज १३० असेल तर तो दिवस (१३० - १०० बरोबर ३०) गुणांनी शुभ असतो आणि हे ३० गुण मध्याच्या वर मांडले जातात. गुणांची बेरीज १०० पेक्षा कमी असेल तर (१०० वजा गुणांची बेरीज) इतक्या गुणांनी तो दिवस अशुभ असतो. उदा. बेरीज ७५ असेल तर तो दिवस (१०० - ७५ बरोबर २५) गुणांनी अशुभ असतो आणि ग्राफमध्ये हे २५ गुण मध्याच्या खाली मांडले जातात. असे ३६५ पैकी प्रत्येक दिवसासाठी केले जाते. नंतर या सर्व दिवसांच्या गुणांची सरासरी काढली जाते आणि ही सरासरी ग्राफचा मध्य असतो. यानंतर आमचे संशोधन आणि अनुभवाप्रमाणे स्टेप अप, स्टेप डाऊन, स्टेप डाऊन टू अप, स्टेप अप टू डाऊन इत्यादिना गणिताने गुण दिले जाऊन, आमच्या अनुभवाप्रमाणे प्रारब्धीय सत्त्व, रज, तम प्रभावाचा मेळ घालून शुभ- अशुभ कालावधी निश्चित केले जातात. अनेक प्रकारच्या प्रदीर्घ संशोधनानंतर हे सिद्ध झाले की खालून मध्यरेषेच्या वर जाणारा ग्राफ शुभ असतो, तर वरून मध्यरेषेच्या खाली जाणारा ग्राफ अशुभ असतो. शेवटी प्रोग्राममध्ये असणार्या सूचनांप्रमाणे बारा महिन्याच्या ग्राफमध्ये शुभ/हिरवा रंग आणि अशुभ/लाल रंगात दर्शविला जातो.

कॉम्प्युटरने हे सर्व काही सेकंदात होते आणि कॉम्प्युटरच्या स्क्रीनवर १२ महिन्याच्या ग्राफच्या स्वरुपात दाखविले जाते. रंगामुळे कोणालाही हे शुभत्व- अशुभत्व सुलभतेने कळते. हे शुभत्व-अशुभत्व व्यक्तीनिष्ठ, विषयवार, प्रारब्धनिष्ठ असते. शुभ कालावधीच्या तारखा पाहण्याची सोय आहे. शुभ आणि अशुभ कालावधी एकानंतर एक असतात. त्यांची लांबी ५ दिवसापासून ३-४ महिन्या पर्यंतही असते. दोन शुभ कालावधीमधील कालावधी अशुभ असतो. एक व्यक्तीचे एका वेळी नऊ पर्यंत ग्राफ काढता येतात. दोन ग्राफची सुरुवातीची तारीख एकच असेल तर त्यामधील समान शुभ कालावधी पाहण्याचीही सोय आहे. याचा खूप उपयोग होतो.

### १.५.५ ग्राफमध्ये दर्शविलेले काळाचे शुभत्व- अशुभत्व प्रारब्धनिष्ठ असते.

हे सिद्ध झाले आहे, कसे ते आता पाहू. आधी १.१.२ मध्ये सांगितल्याप्रमाणे ३० वर्षात मी ३५००० व्यक्तींचे रेकॉर्ड जमा झाले. त्यातील ज्यांच्या आयुष्यातील वेगवेगळ्या घटना, घटनांच्या तारखा आणि घटनांची पुढील काळातील चांगली- वाईट फळे रेकॉर्डला होती अशाच केसेस मी विचारात घेतल्या. नुकसान, विलंब, अडथळे, अपयश ही अनिच्छनीय, वाईट फळे तर लाभ, अनपेक्षित सहाय्य, यश ही इच्छनीय, शुभ फळे होत.

या संग्रहात जीवनातील अनेक विषयांच्या घटना होत्या. त्या 'ग्राफिक' सोफ्टवेअरने तपासल्या तेव्हा असे आढळले की जेव्हा घटनेची वाईट फळे मिळाली होती तेव्हा विषयाची सुरुवात झाल्याची किंवा घटनेची तारीख त्या विषयाच्या ग्राफमध्ये अशुभत्वात होती, उलट जेव्हा चांगली फळे मिळाली तेव्हा घटनेची तारीख नेहमी ग्राफच्या शुभत्वात होती. याने १.२.३ मध्ये दिलेला प्रारब्धीय फळाबाबतचा होराशास्त्राचा नियम सिद्ध झाला, म्हणजेच ग्राफिकने मिळणारे ग्राफमधील काळाचे शुभत्व- अशुभत्व हे प्रारब्धनिष्ठ आहेत हे सिद्ध झाले. **महत्वाचे म्हणजे केवळ प्राचीन शास्त्र हेच 'ग्राफिक'चा आधार आहे आणि त्यामुळे प्राचीन शास्त्राची सत्यताही आपोआप, विज्ञानपद्धतीने सिद्ध झाली आहे**.

### १.५.६ ग्राफ हा विज्ञान पद्धतीप्रमाणे असतो. त्यात कोणीही बदल करू शकत नाही.

ग्राफसाठी द्यावी लागणारी सर्व माहिती (१.५.२ पहा) वास्तवाधारित असते. विज्ञानाला अमान्य असे (उदा. फुलाचे नाव, एखादा मनात आलेला नंबर असे अशास्त्रीय) काही नसते. ग्राफिकला दिलेली माहिती तीच असेल तर कोणीही, कोठेही, केव्हाही काढलेला ग्राफ तोच असतो, त्यात कोणीही बदल करू शकत नाही. जरूर ती माहिती सोफ्टवेअर मध्ये एन्टर करणे एवढेच कॉम्प्युटर चालवणार्याच्या हातात असते. आपली आवड किंवा मताप्रमाणे यात कोणीही- अगदी डॉ. गाडेकर सुद्धा- बदल करू शकत नाहीत. त्यामुळे व्यक्तिगत मताला वावच

नसतो, त्यामुळे चुकीच्या मार्गदर्शनाची संधी कोणालाच नसते. हे सर्व विज्ञानमान्य पद्धतीचे असल्याने विज्ञानाला आणि कोणालाही मान्य असेच आहे.

विज्ञानाच्या दृष्टीकोनातून पाहिले असता ग्राफ कसा तयार होतो याला महत्व नाही. दिलेली माहिती विज्ञानमान्य पद्धतीची असेल, मोठया संख्येने केसेस तपासल्या असता दिवसांचे शुभत्व- अशुभत्व वास्तव फळाच्या चांगले- वाईट असण्याप्रमाणे अचूक आणि सुसंगत असेल, सामान्याना निर्णय सहज समजत असतील तर अशा पद्धतीला 'वैज्ञानिक' म्हणण्याला विज्ञानाचा काहीच आक्षेप नाही.

१.५.७ संशोधनाचा दिलासा :- गेल्या ५० वर्षात केलेल्या संशोधनानुसार ग्राफची विज्ञान छाननीनुसार आलेली अचूकतेची क्षमता पुढील प्रमाणे आलेली आहे. कोणत्याही बाबतीत विज्ञान छाननी ही मान्य केली जाते आणि सामान्य माणूस ती स्वीकारतो आणि त्याचा उपयोग निश्चींत पणे करून घेण्यास प्रवृत्त होत असतो. पुढील प्रमाणे आलेली ग्राफिकची निर्णय क्षमता ९० टक्के अचूक असल्याने या ग्राफ वरून तुम्ही घेतलेले निर्णय हे असेच अचूक असल्यामुळे तुम्ही त्याच्यावरून आप्त मित्रांना मार्गदर्शन केले असता त्यांचे कोणाचेही नुकसान होणार नाही याची आम्हाला खात्री आहे. असे संशोधन कोणी आजवर केलेले नाही.

| | घटना | + | ग्राफ | = | एकूण अचुकत्व |
|---|---|---|---|---|---|
| अ१- गूप :- एक पत्रिका अनेक विषय अनेक ग्राफ | १४० | + | ३५६ | = | ४९६ |
| अ२- गूप :- मेदनीय पध्दत. एक पत्रिका अनेक विषय अनेक ग्राफ | २४६ | + | ५३५ | = | ७८१ |
| ब - गूप :- घटना विषय एक पत्रिका अनेक | ९६ | + | ११२ | = | २०८ |
| क - गूप :- अनेक घटना अनेक पत्रिका | `१५२ | + | २०७ | = | ३५९ |
| एकूण | ६३४ | + | १२१० | = | १८४४ |

एकूण ८२ शोधनिबंधा मधून घटना ६३४, ग्राफ १२१० असे एकूण १८४४ आलेले निर्णय अचूक आहेत ते JM_4E10 वर शेवटी पहा. याशिवाय ४५ माहितीबाबतचे लेख, एक ५०० पानी थीसीसचे पुस्तक ज्यावर पीएचडी मिळालेली आहे, जीवनमार्गदर्शन भाग १ हे १७३ पानी पुस्तक प्रसिध्द करण्यात आलेले आहे आणि मागणी केल्यास कोणलाही मिळू शकते. साईटवर सुमारे एक हजार पानी माहिती ठेवण्यात आलेली आहे. सर्वकाही इंटरनेटवर प्रसिध्द केलेले असून विनाशुल्क कोणालाही अभ्यासता येते. विज्ञान पध्दतीचा आधारानुसार काहीही दडवून ठेवलेले नाही.

१.५.८ नम्रतेची विनंती.

आम्ही आमच्या ५० वर्षाच्या संशोधनाच्या आधाराने अनेक मते आपल्यापुढे मांडलेली आहेत. त्यातील बरीचशी मते तुम्हाला पटलेली नसतील असेही होउ शकते. उदा. १. एका दिवसात जन्मलेल्या २२८००० मुलांपैकी प्रत्येक लग्नाची १९००० लोकांच्या जन्म पत्रिका समान असतात त्यामुळे कुंडली ही भविष्य सांगण्याचे साधन होऊच शकत नाही. २. ज्योतिषशास्त्राचा हेतु भविष्य कथनासाठी नसून आध्यात्मिक विचारसरणीने केवळ जीवनमार्गदर्शनार्थ आहे. ३. सूक्ष्मतेचा आग्रहाने योग साधना व्यतिरिक्त विचाराने लादली गेलेली नव संशोधित हर्षल, नेपच्यून, प्ल्युटो, राहू, केतू आदींची नवीन तयार केलेली कारकत्वे/नियमावली प्राचीन शास्त्रबाह्य आहेत. ४. पूर्वीच्या मोजमापात अधुनिकतेने बदल झाला तरी पूर्वी ज्या नियमाला धरून विंशोत्तरीची रचना ३६० तिथीची रचना योग्य होती. त्यात सध्याच्या सुधारित मोजमापन पध्दतीचा वापर अयोग्य आहे असे ठरविले गेले आहे. ५. विविध ग्रह, देवदेवता, उपासना जप, उपाय योजना, विधी, अंक, वस्तूच्या नांवावरूनचे अंदाज अशा नवीन प्रथा या प्राचीन शास्त्राला धरून नसल्याने निरूपयोगी आहेत. ६. एकच पत्रिका आणि प्रश्न असेल तरीही दहा जणांची दहा मते होत असतात हे चूक असावे. ७. कोणत्याही पध्दतीत इष्ट निर्णय सांगण्यासाठी आणि अनिष्ट निर्णय सांगण्यासाठी अनेक नियम असतात. दहा जणामध्ये सर्वांनी त्यातून निवडलेले इष्टानिष्ठतेपैकीचे नियम एक सारखे कधीच येत नसल्याने अनेकांची अनेक उत्तरे अनेक होत असतात.

या आणि अशा बाबी जरी सशास्त्र पध्दतीने आम्ही तुमच्या निदर्शनास आणून दिल्या असल्या आणि त्यातील काही तुम्हाला अमान्य असल्यास तुम्ही त्याकडे दुर्लक्ष करावे ही विनंती करीत आहे. ते केवळ आमचे मत समजून त्यागावे. आमच्या संशोधना मुळे समाजाला या प्राचीन शास्त्राचा उत्तम उपयोग होत असून ते विज्ञान छाननीने सिध्द झाले असल्याने त्याच्याकडे वरील कारणामुळे तुमचे दुर्लक्ष होऊ नये या अपेक्षेने ही विनंती करण्यात येत आहे.

आमच्या पध्दतीत विनासायास अचूक उत्तरापर्यत पोहोचता येते आणि ते समाजाला उपयुक्त ठरते, सखोल अशक्य अभ्यासाची गरज रहात नाही आणि जे अवाढव्य आपल्या स्मरणातही राहू शकत नाही त्यामुळे चुका होउन कदाचित जातकाचे नुकसान होत असेल तर तुम्ही आमच्या विज्ञान पध्दतीने सिध्द केलेल्या ग्राफिकच्या निर्णयाचा, कोणतीही मनात वरील पैकी शंका न बाळगता ग्राफच्या निर्णयाचा स्वीकार करावा म्हणजे जातकाचे आगर तुमचे नुकसान टळेल. म्हणून आमची पध्दत निशंक स्वीकारावी ही विनंती आहे.

### १.५.८ ग्राफिकच्या विषयांची यादी खालील प्रमाणे आहे.

| अलु. नंबर | विषय | अनु. नंबर | विषय | अनु. नंबर | विषय |
|---|---|---|---|---|---|
| ०१ | शारीरिक व्यंग, व्याधि | ०२ | स्वभाव, आचरण | ०३ | मन, मानसिक |
| ०४ | विवाह योग | ०५ | धन संचय करणे | ०६ | संपर्क, भाषण |
| ०७ | विद्वत्ता | ०८ | भ्रातृ भाव संबंध | ०९ | पराक्रम, साहस |
| १०.१ | कलह -कौटुंबिक | १०.२ | कलह - व्यवसायात | १०.३ | कलह - भागीदारीत |
| ११ | मातृ संबंध | | | | |
| १२.१ | स्थावर - पूर्वार्जित | १२.२ | स्थावर - स्वकमाईची | १२.३ | स्थावर - आयती/भाडोत्री |
| १३ | वाहन | | | | |
| १४.१ | आप्तेष्ट - माता संबंधीत | १४.२ | आप्तेष्ट - पिता संबंधीत | १४.३ | आप्तेष्ट - व्याही/सासुरवाडी |
| १५ | संतती संबंध | १६ | शिक्षण बुध्दी | १७ | धार्मिक कार्य |
| १८ | गूढ, ज्योतिष शास्त्र | १९ | तब्बेत, आजार | २० | कामगार, नोकर |
| २१ | कौटुंबिक | २२ | शत्रुत्व, कोर्ट खटले | २३ | स्थलांतर बदली |
| २४ | विनासायास हव्यास | २५ | गूढ आजार | २६ | धार्मिक विध्दी, तीर्थाटण |
| २७ | आध्यात्मिक | २८ | सामाजिक संबंध | २९ | सामाजिक सुख |
| ~~३०~~ | ~~सारांश जीवन~~ | ३१ | व्यवसाय, नोकरी | ३२ | पिता संबंध |
| ३३ | राजकीय संबंध | ३४ | आप्तेष्ट संबंध | ३५ | इष्ट मित्र संबंध |
| ३६ | आर्थिक मिळकत | ३७ | मौल्यवान वस्तू | ३८ | पिता - आप्त संबंध |
| ३९ | कायदेशीर बाबी | ४० | राजकीय विरोध | ४१ | धन हानी/व्यय |
| ४२ | मानसिक विकलता | ४३ | कारस्थान प्रियता | | |

## प्रकरण २

### 'ग्राफिक'ने अचूक, सफल मार्गदर्शनाची उदाहरणे

**निवेदन-** आम्ही आजवर 'ग्राफिक'च्या आधाराने अनेकांच्या प्रश्नांचे विश्लेषण केले आहे, आणि 'ग्राफिक'च्या सहाय्यानेच त्यांना कोणत्या कालावधीत कृति करावी याचे मार्गदर्शन दिले. ते त्यांनी वापरले आणि सफलता मिळाली. तसेच नवे काम वा नवा विषय सुरू करण्यासाठी काहींना मार्गदर्शन दिले. त्यात त्यांना यश मिळाले. **'ग्राफिक'चे मार्गदर्शन वापरून ज्यांनी मिळालेले परिणाम आम्हाला कळविले, अशी अनेक वेगवेगळ्या विषयांची काही प्रातिनिधिक उदाहरणे या भागात दिली आहेत** त्यावरून ग्राफिकची अचूकता आणि उपयोगिता तुमच्या लक्षात येईल.

सामान्य माणसाना **दैनंदिन जीवनातील अनेक बाबतीत ग्राफिकचा उपयोग करून घेता येतो**. उदा. नोकरी, व्यवसाय, विवाह, मालमत्ता विकत अगर भाड्याने देणे घेणे, किमती वस्तू ( टीव्ही, कॉम्प्युटर, वॉशिंग मशीन, स्कुटर, कार, दागिने ) 'ग्राफिक'चे व्यक्तिनिष्ठ, विषयवार, प्रारब्धनिष्ठ असे शुभ कालावधी वापरून फायदा करून घेता येईल. पंचांग मुहूर्त व्यक्तिनिष्ठ नसल्याने त्याचा 'ग्राफिक' सारखा उपयोग होण्याची खात्री नसते.

**व्यापारी, कारखानदार, बिल्डर्स, डॉक्टर असे व्यावसायिक यांनाही त्यांच्या व्यवसायात अनेक नित्याच्या महत्वाच्या बाबतीत 'ग्राफिक' चे मार्गदर्शन वापरता येते.** उदा. व्यवसायात बदल करणे, नवे प्रोजेक्ट/व्यवसाय वाढवणे/सुरू करणे, कर्ज घेणे/देणे, व्यवसायासाठी जागा वाहन घेणे, मोठ्या किमतीची यंत्रसामग्री मशिनरी घेणे, मोठ्या ऑर्डर्स घेणे/देणे, महत्वाचे अधिकारी नेमणे अशा व्यवसायाच्या अनेक बाबतीत 'ग्राफिक'चा उपयोग उत्तम होत असतो.

**'ग्रफिक'च्या वापराने दुहेरी फायदा होत असतो** - नवा विषय 'ग्राफिक'च्या शुभ कालावधीत वापरून मिळणारा लाभ, सुख याची वृध्दी होते, दुसरीकडे अशुभ कालावधी टाळून अडचणी नुकसान टाळता - कमी करता येते. या पध्दतीच्या वापरातून उत्तरेकडील अनेक छोट्या कारखानदारांनी अशुभ कालावधी टाळून अडचणी, नुकसान टाळत, कमी करता येते याचा प्रत्यक्ष अनुभव घेतला. त्यानंतर त्यानी कारखान्यासाठी फुकटचा पगार देउन नेमलेला ज्योतिषीच्या ऐवजी ग्राफिक सॉफटवेअर खरेदी करून वापरले आणि कारखाना नुकसानीतून नफ्यात आणला.

अर्थात कोणाला किती लाभ होईल त्याचे प्रमाण हे व्यक्तिगत प्रारब्धाशीच निगडित असते. परंतु ग्राफिक पध्दतीत शुभत्वात आपली कृती केल्यास त्याचा लाभ होतो आणि प्रामुख्याने नुकसान होत नाही. **लाभ हा प्रारब्धाने होत असतो आणि नुकसान हे मानवी चुकीने होत असते आणि तेच वाचवणे हे ग्राफचे महत्वाचे काम असते. नवीन चुका करण्याने होणारे नुकसान हे प्रारब्याच्या मध्यस्थीने टळू शकत नाही या महत्वाच्या बाबी लक्षात ठेवून ग्राफचा उपयोग करून घ्यावा.** नवीन चुका करण्याने, आपला आळस किंवा दुर्लक्ष यामुळे होणारे नुकसान हे प्रारब्याच्या मध्यस्थीने टळू शकत नाही या महत्वाच्या बाबी लक्षात ठेवून ग्राफचा उपयोग करून घ्यावा.

या भागात खालील लेख आहेत. लेख क्रमांक हे वेबसाइट अनुक्रमणिकेनुसार आहेत. पूर्ण लेखासाठी वेबसाइट वरील इंडेक्स फाईल मधील JM_4M10 पहा. फाईल साईट वरून डाउनलोड करून वाचू षकता.

लेख क. ८० - मोठ्या कर्जाची (६ कोटीची ) वसुली

लेख क्र. ७५ - अनेक वेळा केलेल्या टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग असफल,(पण ग्राफिकच्या शुभत्वात यश.)

लेख क. ५३ - विवाह मुहूर्त - योग्य पध्दती, (एका मांडवात दोन लग्ने असफल,
पण ग्राफिकच्या सहाय्याने यश)

लेख क. ८१ - ग्राफिकच्या अचूक मार्गदर्शनाची प्रचिती;(व्हिसा, जागेत सुख लाभत नाही, होमलोन)

लेख क. ७८ - ज्योतिष व्यासंगीना आव्हान व आवाहन (वाहन, व्यवसाय)

## लेख नं. ८०- मोठ्या कर्जाची (६ कोटीची ) वसुली

(**टीप-** जीवन मार्ग दर्शन भाग १ या आमच्या पुस्तकात हा लेख आहे. या व्यक्तीने एकाला मोठ्या रक्कमेचे कर्ज दिले होते. व्याज तर राहोच, १० वर्षानंतर मुद्दलही वसूल होत नव्हते. आता काय करावे असा त्यांना प्रश्न पडला होता. त्यांनी अनेक ज्योतिषांचा सल्ला घेतला, सांगितलेले सर्व उपायही केले, पण काही उपयोग झाला नाही. अखेर प्रख्यात ज्योतिषी कमलाकर सवाई यांच्या सांगण्यावरून ते दादाना भेटले. दादानी ग्राफिकने या प्रश्नाचे अचूक विश्लेषण करून काही मिनिटात गाईडलाईन्स दिल्या, त्यानुसार त्या व्यक्तीने प्रयत्न केले आणि दिलेली रक्कम काही काळात परत मिळाली. ही एक दादा गाडेकरांनी ग्राफिकने ५-१० मिनिटात सोडविलेली अत्यंत वेगळी केस मी त्यांच्याकडून ऐकली होती. माझाही कृष्णमूर्ती पद्धतीचा अभ्यास आहे आणि आव्हान म्हणून मला ती के. पी. प्रमाणे सोडवून पहायची होती. माझ्या आग्रहाने दादानी या व्यक्तीचा जन्म तपशील आणि तारखा त्यांच्या जुन्या नोटस मधून शोधून काढल्या. मी के.पी. पध्दतीने प्रयत्न केला, पण हा प्रश्न मला सोडवता आला नाही.-- विजय म्हैसकर )

पूर्वनिश्चिती शिवाय लोक ऑफिसमध्ये भेटायला येणे ही दादा गाडेकरांसाठी नित्याचीच बाब आहे. (कारण ग्राफिक पध्दतीत अचूक आणि अल्पवेळेतच प्रश्नाचे निर्णय मिळत असल्याने वाट पहाणे फार नसते). असेच फेब्रुवारी २००० मध्ये एका दिवशी सकाळी ऑफिसमध्ये श्री. त्रिपाठी नावाचे एक गृहस्थ त्यांना भेटायला आले. ऑफिसमधील आधीचे गृहस्थ बाहेर पडल्यावर आत येउन स्वत:चा परिचय करून देऊन ते म्हणाले, ''दादासाहेब, नमस्कार. इंदोरचे प्रसिध्द ज्योतिषी श्री. सवाई यांनी हा किचकट प्रश्न तुम्हीच सोडवू शकता असे सांगितले. त्यामुळे आधी न कळविता मी मध्यप्रदेशातील इंदोरवरून येथून आलो आहे.''

दादा- '' ठीक आहे, काही हरकत नाही. काय प्रश्न आहे ते थोडक्यात सांगा.''

श्री. त्रिपाठी- ''मी एका फार मोठया अडचणीत सापडलो आहे. एका सरकारी खात्यात मोठ्या हुद्द्यावर मी नोकरी करत होतो. बहुतांशी संबंध हे राजकीय पुढारी, सत्ताधारी अशांशी येत असत व नाइलाजाने त्यांच्याशी

चांगले संबध ठेवावे लागतात. असे असल्याने राजकीय क्षेत्रात वावर मोठा होता. एकदा एका मंत्र्याच्या नातलगाने कर्ज स्वरूपात दहा कोटीची मागणी त्यांनी केली. पण इतके पैसे माझ्याकडे नाहीत असे सांगितले. काही कारणासाठी मी त्याला सहा कोटी रूपये कर्ज दिले. व्याज तर राहोच, पण ते मुद्दलही गेली १० वर्षे वसूल झालेच नाहीत. या दहा वर्षात बरेच प्रयत्न केले, अनेक ज्योतिषांकडे गेलो. पैसे मिळाले तर काही अधिक बिदागीही देण्याचे ठरले, त्यांनी सांगितले ते सारे उपाय केले, नागबलीकी काय तेही केले, सर्व प्रयोग करून आणि १० वर्षात अमाप खर्च करून काहीच उपयोग झाला नाही. आता त्यावेळी व्याजाच्या अपेक्षेने ही रक्कम दिली खरी पण आज मला त्या मुद्दलाचीच खूप गरज आहे. तुम्ही काहीही करा ही रक्कम मला मिळवून द्याच. ''

त्यांचे जन्म रेकॉर्ड: जन्म तारीख ८-७-१९४४, जन्मवेळ- नोंदीप्रमाणे दुपारी २- १५ पण वॉर टाईम डिफरन्स प्रमाणे दुपारी १.१५, उत्तर रेखांशा २२.४४ व पूर्व अक्षांशा ७५.५०.

पुढार्यांच्या नातलगाला दि.५.२.१९९० रोजी सहा कोटी उसनवारी, व्याजाने रक्कम दिली. सर्व काही एकाच दिवसात झाले. आलेले काही राजकीय पुढारी, बडे अधिकारी अशी मंडळी जेवायलाच त्रिपाठींकडे आली होती. चेक दिल्यावर टाईप करून आणलेली रिसीट आधीच तयार होती त्याच रिसीटवरून ही तारीख त्यांच्या सेक्रेटरीने सांगितली आहे. मिळालेल्या तारखाची कोष्टाष्टक छाननी पुढील प्रमाणे आली.( सदरची कोष्टाष्टक पध्दत ही या पध्दतीत आवर्जून वापरली जाते. ती जीवनमार्गदर्शन भाग १ पुस्तकात आहेच शिवाय पुढील संकल्पित भाग २ मध्येही देणार आहोत.)

ग्राफविषय आणि त्यांचे नंबर्स याची यादी भाग १ मध्ये आणि वर १.५.८ मध्ये दिली आहे, त्यातून या घटनेशी संबंध करणारे ग्राफ नं. निवडून त्यांचे ५.२.१९९० या तारखेसाठी ग्राफ काढले. ५.२.१९९० ही तारीख ३६ आर्थिक आणि ४१- धननाश, धनहानी या दोन्ही ग्राफमध्ये शुभ (+) होती. पण ३९- कायदेशीर अडचणी, ३३- राजकीय, ४०- राजकीय विरोध या तीनही ग्राफमध्ये मात्र अशुभ (-) होती. (म्हणजे थोडक्यात +३६, +४१, -३९, -३३, -४०). आता ३३ आणि ४० हे ग्राफ अशुभ असल्याने आणि राजकीय क्षेत्रातील लोकानीच पैसे नेल्याने चोराच्याच हाती राखणीचे काम दिल्यासारखे झाले होते. शिवाय ३९ चा ग्राफ अशुभ होता. <u>याच्या आधी त्रिपाठींना अनेक ज्योतिषांनी 'कायदेशीर मार्गाने आणि राजकीय सहकार्यानेच हे पैसे मिळतील' असा सल्ला दिला होता. पण आमच्या पध्दतीनुसार तो चुकीचाच होता. कारण ३३, ३९, ४० हे तीन्हीही ग्राफ अशुभ असल्याने राजकीय आणि कायदेशीर बाबींचा भावी काळात लाभ होणार नव्हता असा निर्णय ५.२.१९९० लाच निश्चित झाला होता</u>.

दादानी हे स्पष्ट केले आणि पुढे सांगितले ''तरीपण तुमचे पैसे देतानाचे ३६ आणि ४१ हे दोन्ही ग्राफ शुभ आहेत त्यामुळे तुम्हाला तुमचे पैसे मिळायला हरकत नाही. कदाचित बाकीचे ३ ग्राफ अशुभ असल्याने काही रक्कम कमी मिळणे, व्याज न मिळणे असे प्रकार होऊ शकतात. तुम्ही याआधी पैसे मिळण्यासाठी केलेले प्रयत्नाच्या तारखा मिळाल्या असत्या तर त्यात अपयश का आले हे ग्राफवरून चटकन दाखवून दिले असते. हे ग्राफ असे प्रयत्न करताना हमखास अशुभच असणार. कारण हे पंचांगाचा आधार घेतात आणि तो काही व्यक्तिनिष्ठ नसतो.''

नंतर दादानी आगामी १२ महिन्याचे वरील विषयांचे ग्राफ त्रिपाठींना काढून दिले, त्यातील पुढील प्रमाणे शुभ तारखा आल्या आणि या दिलेल्या तारखांनाच त्रिपाठींनी प्रयत्न करावयाचे आहेत असे दादानी सांगितले. (**<u>महत्वाचे</u>**- मित्रहो, ग्राफ हा शुभ तारखा दर्शवितो त्याचा अर्थ ते काम त्यावेळी होईल असा भविष्यात्मक कधीच नसतो. असे शुभ कालावधी हे ते काम करण्यासाठी शुभ असतात, काम त्या शुभ कालावधीत केल्यावर त्याला त्या कामात यश येत असते असा हा शुभ कालावधीचा अर्थ समजायचा आहे.) १ ते १५ एप्रील २००० मध्ये ३६, ४१ आणि ३३ शुभ होते. १७ ते ३० एप्रील २००० मध्ये ३६, ४१ आणि ४० शुभ होते, तसेच नोव्हेंबर २००० च्या पहिल्या पंधरवड्यात ३६, ४१ आणि ४० हे ग्राफ शुभ होते. दादानी त्यांना रिपोर्ट देताना एप्रील आणि नोव्हेबरचे हे कालावधी दिले आणि सूचना केली, ''आज १५/०२/२००० तारीख आहे. या नंतर अशुभत्व असल्याने दोन महिने कोणालाही फोन करायचा नाही. एकदम २/०४/२००० रोजी फोन करायचा आणि पैशाची नम्रतेने विचारणा करायची''.

याप्रमाणे त्रिपाठींनी सूचना तंतोतंत पाळल्या. २ एप्रीलला फोन केला त्यावेळी त्या पैसे घेणाराने एक आठवडा थांबा असे त्रिपाठींना सांगितले. ९/४ तारखेला फोन केल्यावर ११/०४/२००० रोजी दोन कोटी रोख मिळाले. त्यानंतर मुदत संपण्याआधी फोन केला असल्याने त्यांनी स्वत: बोलवून २९/०४/२००० रोजी दीड कोटी दिले. असे साडेतीन कोटी मिळाल्यावर त्रिपाठींनी दादाला फोन करून सांगितले, ''दादा, साडेतीन कोटी मिळाले आहेत.'' त्यावेळी दादानी त्रिपाठींना आठवण करून दिली की आता नोव्हेंबर आल्या शिवाय कोणालाही फोन

करायचा नाही. त्याप्रमाणे नंतर दिनांक ०६/११/२००० रोजी अडीच कोटी मिळाले. त्रिपाठींनी कबूल केले की ''इतक्या साध्या पध्दतीने पैसे मिळतील असे मला खरेच वाटले नव्हते पण केपी चे सवाईंनी आधार दिल्यामुळे मी थांबलो आणि सर्व पैसे मिळाले पण तुमच्या सांगण्याप्रमाणे व्याज मात्र मिळालेच नाही.''

त्यावर दादा म्हणाले, ''त्रिपाठी साहेब, *ही ग्राफिकची पध्दत साधी आहे असे बिलकुल समजू नका कारण तो आमच्या प्रदीर्घ संशोधनाचा आणि प्राचीन होराशास्त्राचा अवमान होईल.* दिसतं तसं नसतं. (बरेचसे ज्योतिषी समजतात की नुसता ग्राफ तर आहे, त्यात काय विशेष असे आणि दुर्लक्ष करतात. त्यांचे असेही मत असते की 'सर्वच काही ग्राफवरुन अचूक कळत असल्यावर आम्हाला काय किम्मत राहिली?') **प्रारब्धनिष्ठ होरा हीच खरी प्राचीन सशास्त्र पध्दत आहे**. हा ! आता भविष्याची अपेक्षा करणारांना ही पध्दती साधी वाटणे सहाजिक आहे, पण तो त्यांचा भ्रम आहे. पंचांग असो वा इतर कोणतीही पध्दती असो, ती विज्ञान छाननी नुसार तपासली तर त्यांची अचूकता आणि उपयुक्तता याबाबत ग्राफशी तुलना होणार नाही. ग्राफिक हेच फक्त विज्ञान पद्धतीने सिद्ध केलेले असून ९० टक्के अचूक आहे. मग पंचांग किंवा तत्सम पद्धतीने दिले जाणारे मुहूर्त समाजाला किती उपयुक्त ठरत असतील हे तुम्हीच शोधा.''




दादा पुढे बोलले, ''शुभ काळातच आणि तेही नम्रतेने फोन का करायचा असा तुमच्या मनात प्रश्न आला असेल. समजा, तुमच्या जवळच्या मित्राला काही मोठी रक्कम उसनी दिली आहे. तुम्ही अशुभ कालावधीत त्याच्या परतफेडीची मागणी करत राहिलात, तर तो मित्र कंटाळून एकदाचे तुम्हाला सांगेल की ''मित्रा, मी तुला पैसे देणे लागतो हे खरे आहे पण आता मी तुझे पैसे देऊ शकत नाही, तुला काय करायचे ते तू कर.'' नातेवाईकातही हे असे घडत असते. कारण अशुभ कालावधीत मागणी केली गेली तरीही होराशास्त्राचा नियम लागू पडतो आणि प्रकरण बिघडून काही मिळण्याचे चान्सेसही घालवले जातात. तात्पर्य, जे प्रारब्धाने मिळणार असते, ते देखील हातचे जाते. हे असे व्हायला नको असेल तर शुभ कालावधीतच संपर्क साधावा लागतो. आता ग्राफिकशिवाय हे व्यक्तिनिष्ठ अचूक कालावधी निघतच नसतील आणि हे सामान्य अभ्यासक हजारो लोकांना रोज पंचांगाचे स्थूल कालावधी म्हणून 'शुभ मुहूर्त' सांगत असतील तर त्याने जातकाचे काय कल्याण होणार?''

हे वास्तव असल्याने सर्व सामान्यांना प्राचीन शास्त्रानुसार व्यक्तीनिष्ठ, विषयवार शुभ कालावधी अगदी माफक मूल्यात मिळावे म्हणूनच यासाठी जीवनमार्गदर्शनने वर्षफलाचा ३६ जोड ग्राफचा पर्याय सर्वांसाठी उपलब्ध

केला आहे. सॉफ्टवेअर न घेताही या पर्यायाचा वापर करून लाभ होईल. त्याचा जरूर अनुभव घ्याच. दादा म्हणतात, ''हे असे असले तरी काही लोक ग्राफबाबत बिनबुडाचा अपप्रचार करतात. काहीजण तर असे म्हणणारे भेटतात की, ''केवळ शुभ कालावधी तर कळतात. मुहूर्त तर काय पंचांगात आहेत. आम्ही जसे लोकांचे अनेक प्रश्न एकशे दहा टक्के अचूक सोडवीत असतो, त्यात याचा काय उपयोग होणार आहे?'' त्यांनी वरील केस, अथवा आमच्या साईटवरील ग्राफिकने अचूक सोडविलेले प्रश्न, घेऊन ते त्यांच्या आवडत्या पद्धतीने अचूक सुटतात का ते पहावे. मीही केपीचा अभ्यासक आहे स्वत: दादाही पारंपारिकचा मोठा अभ्यासक आहे पण या पध्दतीचे मार्गदर्शन केवळ पत्रिका पध्दतीने कदापीही देता येत नाही हे आम्हा दोघांनाही कळून चुकले आहे . मित्रहो तुम्हाला येथे सर्व तारखा वगैरे दिलेल्याच आहेत. तुम्ही जी कोणती पद्धत वापरत असाल त्या पद्धतीने असे अचूक विषयनिष्ठ, काळनिहाय मार्गदर्शन करता येते का पहा आणि अचूक येत असेल तर आम्हाला जरूर कळवा. अनेकांनी याचा अनुभव घेतला आहे. हे तुम्हाला देखील अनुभवाने प्रत्ययास येईल.

श्री. विजय म्हैसकर.)

## लेख क्र. ७५ - अनेक वेळा केलेल्या टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग असफल

'पत्रिका एकच असताना भिन्न कालातील अचूक मार्गदर्शन.'

एकाच जन्म पत्रिकेवरून वेगवेगळ्या कालावधीतील घटनांची तपासणी करणे हा एक अभ्यासनीय भाग आहे, पण तो अनेकांचा दुर्लक्षित असलेला भाग असतो. काही लोक केवळ जन्म पत्रिका घेऊन त्यातील नक्षत्र, ग्रह, भाव, भावेश, शास्त्राचे नियम, कारकत्वे यांचा मेळ घालत घडलेली घटना आणि आपले विश्लेषण कसे बरोबर आहे हे दर्शवितात. पण जगांत रोज अशा प्रत्येक लग्नाच्या पत्रिका १९००० लोकांच्या समान असतात हे आपण पाहिले आहे. मग त्या सर्वांसाठी एकच भाकित वर्तवणे याला निर्णय म्हणावयाचे काय? प्रचलित पध्दतीत हा निर्णय सर्वांसाठी वेगवेगळा येवूच शकत नाही कारण पत्रिका समान आहेत आणि ''पत्रिका समान म्हणजे जीवन समान'' असे ठाम गृहीत आहे.

**उदाहरण १** - आमच्या एका मित्राने स्त्री ची केस मला सोडवायला पाठवली कारण त्याचे उत्तर अनेक प्रकारच्या ज्योतिषाकडे त्यांना मिळाले नव्हते. मुलीची जन्म तारीख ५/९/१९८२, जन्म वेळ सकाळी १०.१२, जन्मस्थळ २१-०९-N, ७९-०९-E, +५.३० आहे.

घटना/ प्रश्न- हे कुटुंब सधन आणि चांगले सुखी आहे. या स्त्रीला संतती बाबत अडचण होती. लागोपाठ ८ वेळा टेस्टट्यूब बेबीचा प्रयोग केला पण सर्व असफल झाले. या प्रश्नासाठी त्यांनी मा झ्याकडे संपर्क केला.

संतती सुखाबाबतचा शोधनाचा १ ला भाग :- विवाहाची तारीख ही कौटुंबिक सुख, मुले बाळे या सर्व सुखपूर्तीची जन्म तारीख असते. त्या त्या विषयात लग्न तारखेदिवशी शुभत्व असेल तर ते सुख मिळते, उलट जर अशुभत्व असेल तर ते सुख मिळण्यात अडचणी असतात हे विज्ञान छाननीने अचूक समजते हे सिद्ध केले आहे. याच्या छाननीत आमच्या ग्राफ पद्धतीनुसार लग्नाची तारीख ही २१- कौटुंबिक सुख आणि ४- विवाह योग या दोन्ही विषयात त्या मुलीसाठी शुभ आहे त्यामुळे त्यांना विवाहाचे कौटुंबिक सुख चांगले मिळणार होतेच ते त्याना मिळाले आहे. मात्र १५ नंबर हा संतती सुखाचा ग्राफ विवाहाच्या दिवशी अशुभ आहे. त्या प्रमाणे या संततीच्या अडचणीचा भाग दिसून येत आहे आणि तोच प्रश्न आहे. बर त्या स्त्रीला संतती तरी होईल का? हा खरेतर भविष्यात्मक प्रश्न आहे. हे आमच्या पद्धतीत बसत नाही पण याचे काही प्रमाणात शोधण्याची स्वतंत्र पद्धती आमच्याकडे आहे पण त्याची अचूकतेची टक्केवारी ६०टक्के च्या आसपास आहे. त्याचा नियम असा आहे की कोणत्याही विषयात गर्भ धारणा कालावधीची तारीख (म्हणजे जन्म तारीख वजा ९ महिने, ९ दिवस) आणि जन्म तारीख या दोन्ही तारखा त्या विषयाच्या ग्राफमध्ये ;येथे विवाह विषयातद्ध शुभ असतील तर त्या विषयाचे सुख त्यांना हमखास चांगले मिळणार. पण दोन्हीही तारखा अशुभ असतील तर ते सुख मिळणार नाही अगर कमतरतेचे अथवा अडचणीचे मिळते असा त्याचा अर्थ होतो.

**याला शास्त्राधार एकच की गर्भधारणा काल हा देखील एक प्रकारचा जन्म कालच मानावा लागतो.** या स्त्रीला संतती नाही. यांनी त्यासाठी आजवर एकूण सात वेळा टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग केला आहे. त्याचा हिशोब खाली मांडला आहे. आमच्या पद्धतीत एकावेळी दोन विषय जमेस घेऊन खात्रीशीर निर्णय मिळत असतो. संतती सुखाच्या विषयाबरोबर कौटुंबिक सुखाचीही बाब असते. हे पूर्ण सुख मिळण्यासाठी हे दोन्ही ग्राफ शुभ असावे लागतात. २१ कौटुंबिक आणि १५ संतती सुख, या प्रमाणे २१ कौटुंबिक आणि ०४ विवाह योग, ३१ व्यवसाय आणि ३६ आर्थिक, १६ शिक्षण आणि ३१ व्यवसाय अशा प्रकारे जोड्यांच्या सहायाने या पद्धतीत खात्रीशीर चांगला उपयोग करून घेता येतो. आमच्या ४३ विषयांच्या सुमारे ९०० जोड्या तयार होत असतात. (त्या पैकी गरजेनुसार ३६ जोडग्राफ चा रिर्पोट अल्प फी मध्ये देण्याची सोयही आम्ही केलेली आहे. प्रकरण ४ पहा.) या ४३ विषयाचे अचूक निर्णय ग्राफमधून लाभावे यासाठी मी सर्व विषयांसाठी ३० वर्षे कष्ट घेतले आहेत आणि आता यातील प्रत्येक विषय ९०टक्के अचूक निर्णय मिळत असतो. आपण सर्वानी या मेहनतीचा लाभ घ्यावा अशी प्रांजळ अपेक्षा आहे. अशी सुटसुटीत पद्धत इतरत्र कोठेही नाही.

**घटनांच्या तारखा आणि त्यादिवशी ग्राफचे निर्णय**- हे पुढील प्रमाणे आहेत. वजा चिन्हाने अशुभत्वाचा आणि + चिन्हाने शुभत्वाचा ग्राफचा निर्णय आम्ही दर्शवीत असतो. या बाबतीत आलेले सर्व म्हणजे (-२१, -०४) अशुभ, -(२१, -१५) हे अशुभत्वाचे निर्णय आहेत. (-२१, -१५) याचा अर्थ २१ नं. कौटुंबिक सुख आणि १५ नं. संतती या दोन्हीचा मिळून निर्णय अशुभ आहे. या दोन्हीपैकी एक ग्राफ जरी अशुभ असेल तरी अर्थ पूर्ण सुख मिळेल असे मानले जात नाही म्हणून तो अशुभच असतो कारण मार्गदर्शन करताना खात्रीशीर सुख लाभावे हा हेतू असतो.

| अनु. | तारीख | क्रिया/कृती | ग्राफ चा निर्णय | परिस्थिती/ फळ |
|---|---|---|---|---|
| १. | जानेवारी २०११ | अर्भकाचा नैसर्गीक गर्भपात. | (-२१, -०४) | मूल जगले नाही. |
| २. | ०६/०२/२०१२ | टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग | (-२१, -१५) | ’’ |
| ३. | १४/०७/२०१२ | टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग | (-२१, -१५) | ’’ |
| ४. | १६/०९/२०१२ | टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग | (-२१, -१५) | ’’ |
| ५. | १८/१२/२०१२ | टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग | (-२१, -१५) | ’’ |
| ६. | १८/०४/२०१३ | टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग | (-२१, -१५) | ’’ |
| ७. | २५/०७/२०१३ | टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग | (-२१, -१५) | ’’ |
| ८. | ०३/१२/२०१३ | टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग | (-२१, -१५) | ’’ |

सर्वच वेळी ग्राफचे निर्णय अशुभ असल्याने वरील तारखाना टेस्ट ट्यूब प्रयोग करून संततीचे सुख मिळणार नाही हे टेस्ट ट्यूबचा प्रयोग करण्याआधी आमच्या ग्राफ वरून कळले असते आणि एकूण सात टेस्ट चे अंदाजे १४ लाख रुपये आणि बराच मनस्ताप वाचला असता हे काय थोडे झाले? नाही तरी प्रत्येक प्रयोगाच्या तारखेस या वेळी मूल 'निश्चित होणार' असेच ज्योतिषांनी आणि डॉक्टरने त्यांना सांगितले असणार. एवढा मोठा खर्च वाया गेल्याची जबाबदारी ज्योतिषशास्त्राला नावे ठेवणारे आणि टेस्टट्यूबचा प्रयोग करणारे डॉक्टर घेत असतात काय?

हे सर्व २०११, २०१२ आणि २०१३ या तीन वर्षांचे ग्राफ काढून निर्णय समजायला केवळ पाच ते दहा मिनिटाचा वेळ मला लागला आहे. पत्रिकेच्या सहायाने हा निर्णय काढणे अवघड तर आहेच आणि तो असा अचूक येणार नाही हे ज्योतिषांना लक्षात आलेच असेल. मी ही ४८ वर्षे अभ्यास केलेला ज्योतिषीच आहे तरी पण ग्राफच्या निर्णयाचे आश्चर्य वाटणारात मी देखील आहे. म्हणूनच मी प्राचीन शास्त्राला महत्व देतो. शिवाय हे समजण्यासाठी जन्म पत्रिका, ज्योतिष शास्त्राची शिकवणी आणि पत्रिका सॉफ्टवेअर आदिसाठी हजारो रुपये खर्च करणे, त्यासाठी अनेक वर्षे खर्च करणे याची बिलकुल गरज येथे नाही. इतके हे सहज विना सायास स्वस्तात उपलब्ध होणारे साधन आहे. आज ज्योतिषी होण्या साठी शास्त्र शिकणेसाठी क्लास, पत्रिका सॉफ्टवेअर आणि इतर खर्चासह १९/२३ हजारांचा खर्च होत असतो. एवढे करून ही दोन तीन वर्षानंतर अनुभव येतो की अचूक भविष्य सांगता येईल याची मुळीच खात्री नाही आणि त्यामुळे ज्योतिष सल्लागार होण्याचा बेत रद्द होतो. आमचे 'ग्राफिक' सॉफ्टवेअर वापरण्या साठी ज्योतिषशास्त्राच्या अभ्यासाची जरुरीच ठेवलेली नाही नाही आणि तुलना केल्यास वरीलपेक्षा वेळ आणि खर्च दोन्हीही कमीच लागतील.

**<u>ग्राफिकचे मार्गदर्शन</u>**- या स्त्रीला पुढेही टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग करावयाचा होता. आम्ही ग्राफिकने पुढील काळातील तिच्या २१ आणि १५ या ग्राफमधील समान शुभ कालावधी देउन संततीसाठीचा टेस्ट ट्यूब बेबीचा प्रयोग डॉक्टरांच्या सल्लयाने पण या दिलेल्या शुभ कालावधीतच करण्यास सांगितले.

<u>मिळालेले फळ</u> यापैकीच दिलेल्या शुभ कालावधीत त्यानी हा प्रयोग केल्यावर तिला फेब्रुवारीत गर्भ राहिल्याचे आणि जुळे असून सर्व ठीक असलेचे डॉक्टरनी सांगितल्याचे त्यानी ऑगस्टमध्ये कळविले. नंतर ऑक्टोबर २०१४ मध्ये जुळी दोन मुले झाली असून उत्तम आहेत. **ग्राफिकचे मार्गदर्शन समाजाला कसे उपयुक्त ठरू शकते याचे हे उत्तम उदाहरण आहे**. मार्गदर्शन वापरल्याचे आणि त्याचे काय फळ मिळाले हे आवर्जून कळविले बद्दल या मंडळीना धन्यवाद !

आव्हानाचा विषय असा आहे की विश्वनाथन आनंद च्या एकाच पत्रिकेवरून तो ६ वेळा का जिंकला आणि २ वेळा का हारला, ग्राफ अशुभ असतानाच तो का हरला? तसेच **<u>या स्त्रीच्या पत्रिकेवरून मूल होण्यासाठी टेस्टच्या तारखेस ग्राफ अशुभ होता आणि तिला मुलाचे सुख मिळाले नाही हा ग्राफचा नियम येथे सातवेळा लागोपाठ का जुळला याचा वैज्ञानिकांनी विचार करावा.</u>** पारंपारिक, के. पी कोणत्याही पध्दतीने ही केस हाताळून त्याची कारणे शोधावीत म्हणजे आपल्याला ज्योतिषशास्त्राच्या सखोलतेकडे जाण्यासाठी सुलभ मार्ग सापडेल अशी चर्चा करता येईल. या बाबतीत तुमच्या ज्या शंका असतील त्यावर चर्चा करायला आम्ही तुमचे स्वागतच करू.

## लेख क्र. ५३- विवाह मुहूर्त - योग्य पध्दती

ग्रहांकित ऑगष्ट २०११ आणि ज्योतिष ज्ञान सप्टेंबर २०११

वाढती लोकसंख्या, त्या लोकसंख्रेस असणाऱ्या गरजा पूर्ण करण्यासाठी साधनांची वाढती गरज, कालमानानुसार त्यात होणारे बदल, यासाठी लागणारी नवनिर्माणाची आणि त्यासह टाकाऊ पदार्थांची योग्य विल्हेवाट लावण्याची व्यवस्था अशा सर्व बाबींचा व्यवस्थीत विचार करून ठरविले तरच सामाजिक सुव्यवस्था साधली जात असते. अगदीच अत्यावश्यक गरज असलेल्या वस्तू, अन्न, पाणी, उर्जा/वीज - इंधन या सर्व बाबींचा बारकाईने गणित बध्द विचार करावा लागतो. हे सर्व केले नाही तर जनजीवन विस्कळीत होण्यास फार काळ लागणार नाही. विज्ञान पध्दतीत या सर्वांचा विचार करावाच लागतो अगर होत असतो. हेच बंधन इतर शास्त्रांसाठी असावे लागते. विवाह मुहूर्ताच्या संबधातही अशी दखल घेणे गरजेचे झाले आहे का याचा आपण विचार करणार आहोत.

<u>आपल्या विवाह मुहूर्त पध्दतीत बदलांची आवश्यकता</u> - आमच्या नेहमीच्याच विचार पध्दतीने हा भाग पाहूया. जगात दर २४ तासात २२८००० मुले/मुली जत्माला येतात. आता या सर्वांचे २०/२५ वर्षानंतर विवाह होणार आहेत. म्हणजे पुढील काळात दिवसाला ११४००० या सरासरीने विवाह व्हावयास हवे आहेत. आणखी असे की विवाहासाठी पंचांगाचे मुहूर्त वापरणारे आपण जगात १६ टक्के आहोत असे धरु. बाकी ८४ टक्के लोकांकडे मुळात पंचांग नाही. एक पूर्ण वर्षात ३६५ दिवस गुणिले ११४००० अशी ४ कोटी १६ लाख लग्न जगात व्हावयास हवी असतात. लोकसंख्येच्या प्रमाणात दर वर्षात भारतात सुमारे ७१ लाख लग्ने तर भारताबाहेरच्या जगात ३ कोटी १६ लाख लग्ने व्हावी लागतील. भारताबाहेरच्या जगात लग्ने करण्यासाठी ३६० दिवसापैकी सर्वच दिवस आणि कोणतीही वेळ नित्याने उपलब्ध होत असल्याने ही असंख्य लग्ने निर्विघ्न अनेक गावातून होणे शक्य होत असते. पण भारतात साधारणत: पंचाग मुहूर्त दिवशीच लग्ने होत असल्याने परिस्थिती खूपच गंभीर आहे. गेल्या ४ वर्षात प्रति वर्ष सरासरी १३० मुहूर्त आहेत. आपल्या पंचाग पध्दतीने भारतात ही ७१ लाख लग्ने १३० मुहूर्तातच करणे कितपत योग्य नी शक्य आहे?

गम्मत अशी आहे की आम्ही या पंचाग पध्दतीचा तंतोतंत वापर करूनही बाहेरच्या जगात घटस्फोटाचे जे प्रमाण आहे त्यात आणि आपल्यात फारशी तफावत नाही. असे का? हे पंचांग मुहूर्ताचे महत्व गणिताने जर सिध्द होत नसेल तर त्याचा विचार होणे गरजेचे आहे. हे एक पाराशरांच्या मुहूर्त शास्त्राचे विडंबनच मानावे लागेल.

मी स्वत:च्या मुलांचे विवाह त्यांच्या २१ आणि ४ ग्राफच्या शुभत्वात केले. पंचांग मुहूर्त पाहिले नाहीत. त्यांचे संसार सुखाने चालू आहेत.

या पुढे दिलेल्या उदाहरणावरून तुमच्या लक्षात येईल की जन्मवेळ आदि तपशीलानुसार काढलेल्या २१ आणि ४ या विषयाच्या ग्राफमधील समान शुभ कालावधीत विवाह केला तर घटस्फोटासारखे अनिष्ट प्रकार आढळत नाहीत.

संकेत :- ग्राफचे अनुक्रम नंबर आणि त्याचे विषय :- २१-कौटुंबिक सुख, ०४-विवाह जोडीदार सुख. ग्राफ हा '+' असेल तर शुभ आणि '-' (वजा) असेल तर अशुभ असा चिन्हांचा वापर पुढे करणेत आला आहे.

**उदाहरण** - एका मांडवात दोन लग्ने - इंग्लंडमध्ये एकाच कॉलेज मध्ये शिकणाऱ्या दोन मित्र आणि दोन मैत्रिणींच्या बाबतचे हे उदाहरण आहे. चिरंजीव नं. १ आणि चिरंजीव नं. २ हे मित्र आणि कुमारी नं. १ आणि कुमारी नं. २ अशी चौघांची सांकेतिक नावे दर्शवून ही केस पाहू. चौघांचा जन्म तपशील असा आहे -

चि.नं. १ ची जन्म तारीख २१.१०.१९८४ ०५.०० **Manchester 53.28N/02.12W/0**

चि.नं. २ ची जन्म तारीख ११.१२.१९८४ १५.३१ **Southampton 50.54N/01.24W/0**

कु.नं. १ ची जन्म तारीख १८.०७.१९८५ १६.०६ **England 53.00N/01.00W/0**

कु.नं. २ ची जन्म तारीख १२.०५.१९८५ १३.३० **Manchester 53.28N/02.12W/0**

**घटना** - हे चौघेही एकाच कॉलेजमध्ये होते व मित्र होते. त्यांनी एकाच दिवशी लग्न करण्याचे ठरविले, आणि केले.

चि.नं. १ आणि कु.नं. २ चे पहिले लग्न २२/०३/२००५ रोजी झाले.

चि. नं. २ आणि कु.नं. १ चे पहिले लग्न २२/०३/२००५ रोजी झाले.

या दोन्ही जोडप्यांनी कोणीतरी काढून दिलेल्या पंचांगानुसार, किंवा सोयिस्कर म्हणून, किंवा बचत म्हणून २२/०३/२००५ रोजीच्या मुहूर्तावर लग्ने केली पण चौघांनाही पहिल्या लग्नाचे चांगले सुख मिळाले नाही. म्हणून या दोन्ही जोडप्यांनी घटस्फोट घेतले. पण नंतर याच चौघांनी जोडीदाराची अदला बदल करून पुन्हा दुसरे लग्न करायचे ठरविले. तसे करताना या सर्वांनी मला विवाह करण्यासाठी ग्राफिकप्रमाणे विवाहासाठीच्या तारखा स्वतंत्रतेने विचारल्या.

**नोंद-** ग्राफिकच्या सहाय्याने विवाहाबाबत निर्णय खालील प्रकारे घेता येतो. अ) विवाहासाठी परस्परांच्या जन्मतारखा ग्राफ २१ मध्ये तपासून निर्णय घेता येतो. म्हणजे कुटुंबसुख मिळण्यासाठी मुलाच्या २१ कौटुंबिक सुख या ग्राफ मध्ये मुलीची जन्म तारीख शुभत्वात असावी लागते. तसेच मुलीच्या २१ नंबरच्या ग्राफमध्ये मुलाची जन्म तारीख शुभत्वात असावी लागते, तर त्यांना कॉटुंबिक सुख लाभते. ब) लग्नाची तारीख एकाच्या तरी ४ आणि २१ या दोन्ही ग्राफमध्ये एकाच वेळी शुभ हवी. **ग्राफिकने दिलेले मार्गदर्शन-** त्यांना मी ग्राफिक वरुन, त्यांच्या ४ आणि २१ ग्राफमधील समान शुभ अशा ४/१०/२००५ आणि २६/०९/२००५ या तारखा दिल्या आणि त्याप्रमाणे त्यांनी दुसरी लग्ने केली ती अशी.

चि. नं. १ आणि कु.नं. १ चे दुसरे लग्न ०४/१०/२००५ रोजी मी दिलेल्या तारखेस झाले.

चि. नं. २ आणि कु.नं. २ चे दुसरे लग्न २६/०९/२००५ रोजी मी दिलेल्या तारखेस झाले.

**केलेली कृति आणि मिळालेले फळ-** या लग्नाचे सुख मात्र त्यांना चांगले मिळाले आहे. यांनी आपापले जोडीदार बदलून दुसरा विवाह मी काढून दिलेल्या शुभ कालावधीत केला. गेल्या पाच सहा वर्षात ही जोडपी आनंदाने नांदत आहेत. कोणत्याही प्रकारची अडचण नाही. त्यांची मुले ही चांगली आहेत. एक मात्र झाले आहे की हे शुभ कालावधीत लग्न झाल्यानंतर काही महिन्यांनी हे मित्र मागील कटूता विसरून मैत्री टिकविण्याच्या विचाराने परस्परांच्या चांगल्या समारंभाला एकत्र येतात. पूर्वीचा कलह वाद बराचसा मिटलेला आहे,

**ग्राफिकने केलेले विश्लेषण** - वरीलप्रमाणे चि. नं. १ च्या २१/१०/८४ जन्मतारखेनुसार पाहता

१) त्याच्या २१ कौटुंबिक सुख या ग्राफमध्ये कु. नं. २ ची ज. ता. १२-०५-१९८५ अशुभत्वात आहे, त्यांना कौटुंबिक सुख लाभले नाही.

२) उलट चि. नं. १ च्या २१ ग्राफमध्ये क. नं. १ ची ज.ता. १८-०७-१९८५ शुभत्वात आहे, त्या लग्नाचे विवाह सुख लाभले आहे.

३) १ ल्या लग्नाची २२-३-२००५ ही तारीख चि. नं. १ च्या ४ आणि २१ या दोन्ही ग्राफमध्ये अशुभ आहे, त्याला त्या लग्नाचे विवाह सुख मिळाले नाही.

४) दुसऱ्या लग्नाची ०४-१०-२००५ ही तारीख त्याच्या ४ आणि २१ या दोन्ही ग्राफमध्ये शुभ आहे. त्याला या लग्नाचे चांगले सुख मिळाले आहे.

याच प्रमाणे चि. नं..२ च्या ११/१२/८४ जन्मतारखेनुसार खालील विषयांचे तारीखवार आलेले ग्राफनिर्णय

५) दि. १८/०७/१९८५ त्याच्या ग्राफ २१ मध्ये अशुभ आहे. सुख मिळाले नाही.

६) दि. १२/०५/१९८५ त्याच्या ग्राफ २१ मध्ये शुभ आहे. सुख मिळाले

७) पहिल्या लग्नाची तारीख दि. २२/०३/२००५ ही त्याच्या २१ आणि ४ दोन्ही मध्ये अशुभ. विवाह सुख मिळाले नाही.

८) दुसऱ्या लग्नाची तारीख दि. २६/०९/२००५ ही त्याच्या २१ आणि ०४ या दोन्ही मध्ये शुभ आहे. विवाह सुख मिळाले आहे.

**खुलासा** :- १) या चारीही वर्ग मित्रांनी स्थूल पध्दतीने विवाहाची तारीख काढून दि. २२/०२/२००५ रोजी विवाह केला होता. कोणत्याही वर्षाचा एक ग्राफ काढला तर तो सरासरी सहा महिने शुभ असतो. २१ आणि ०४ या दोन ग्राफना एकत्रित केल्यास त्यातील एका व्यक्तीचे समान शुभत्व दोन ते तीन महिन्याचे असते. त्यातून दोघा जोडप्यांच्या आठ ग्राफचे एकत्रीकरण केले तर काही दिवसाचे समान शुभत्व राहू शकते. त्याच शुभ कालावधीत त्या जोडप्याचा विवाह झाल्यास खात्रीशीर सुख त्यांनी मिळू शकते. पण येथे या दोन जोडप्यांचे एका दिवशी लग्न झाले आहे. अशा वेळी आठ ग्राफचे एकत्रीकरणात समान शुभ कालावधी दोन/चार वर्षात क्वचितच मिळू शकतात. त्यामुळे काही लोक घरातील दोन लग्ने एकाच दिवशी करून खर्च वाचविण्याचा आपल्याकडे प्रयत्न करतात तो चुकीचा भाग आहे. कारण लग्न होणे हे महत्वाचे नसून त्यांना सुख मिळणे आम्ही महत्वाचे मानतो. याच कारणामुळे या दोन्ही जोडप्यांनी एक दिवशी लग्न करण्याचा प्रयत्न केला तो निरूपयोगी ठरला आहे. वरील अनुक्रम नं. ३ आणि ७ मध्ये पहा, लग्नाच्या दिवशी शुभत्व नसल्याने त्यांच्यात प्रचंड वाद होऊन ते प्रकरण घटस्फोटानेच मिटले. आमच्या पध्दतीत हा निर्णय लग्ना आधीच काढू शकतो.

२) अनुक्रम नं. १, २, ५ आणि ६ यातील निर्णयानुसार, जन्मतारखेवरून आलेल्या २१ नंबरच्या कौटुंबिक सौख्याच्या ग्राफ मध्ये जोडीदाराची जन्म तारीख शुभ असणे हे 'एक दूजे के लिये' असण्याचा संकेत आहे. परंतु हा आमच्या संशोधनापैकीचा भाग आहे हे लक्षात घ्यावे. याचे संशोधनाचे अचूकतेचे प्रमाण इतर ग्राफ सारखेच ९० टक्केच आहे की नाही हे अद्याप तपासता आले नाही.

अशा प्रकारे ज्योतिषशास्त्राचा तंतोतंत आणि अत्यंत उपयुक्त मार्गदर्शनाचा लाभ हा जातकाला/समाजाला आमच्या पध्दतीतून निश्चीत मिळतो हे या उदाहरणावरून दिसून येते. त्यामुळे ज्योतिषशास्त्राचे दिलेले निर्णय बरोबर की चूक हे भविष्यात्मक आग्रहाने पहात बसण्यापेक्षा ते निर्णय समाजाला किती उपयुक्त ठरतात यावर या शास्त्राचे महत्व जोतीषांनी अवलंबून ठेवावे. काही शंका असतील तर जरूर विचारून चर्चा करून स्नेह वाढवायला कोणतीही हरकत नाही.

JM_4M10, JM_4E10, Letter01 & Letter03 या फाईलमध्ये याच पध्दतीचे अनेक रिसर्च आमच्या साईटवर **www.jeevanmargdarshan.com** डाऊनलोड सेक्शनमध्ये ठेवले आहेत, ते घेऊन वाचावेत.
डॉ. दादा गाडेकर

## लेख क्र. ८१- 'ग्राफिकच्या' अचूक मार्गदर्शनाची प्रचिती

मी ग्राफिक सॉफ्टवेअरने दिलेले मार्गदर्शन अचूक व उपयुक्त ठरले असल्याचा अनुभव आल्याची काही उदाहरणे येथे देत आहे. या व्यक्तींनी मार्गदर्शन यशस्वी झाल्याचे आवर्जून कळविले होते. असे कळविणारे कमी भेटतात. ( कदाचित त्यांना इतरत्र आलेल्या अनुभवानुसार असावे. ) डॉ. दादा गाडेकर यांनी १९६५ पासून ज्योतिषशास्त्राचे संशोधन करून, अध्यात्म आणि विज्ञानाचाही विचार घेउन स्वत: हे सॉफ्टवेअर तयार केले आहे. ते ९० टक्के अचूक आहे हे त्यांनी विज्ञान पध्दतीने सिध्द केले आहे. माझाही कृष्णमूर्ती पध्दतीचा व ज्योतिष अभ्यास आहे. अनेक ग्रंथ वाचले आहेत. पण अनेक वेळा या प्रकारचे जीवनमार्गदर्शन सारखे मार्गदर्शन कुंडलीवरून देता येत नाही हा माझा अनुभव आहे. मी स्वत:साठीही या ग्राफिकच्या मार्गदर्शनचा उपयोग करून अनुभव घेतला आहे. तुम्हीही घ्यावाच.

सॉफ्टवेअरला व्यक्तिची जन्मविषयक माहिती, यादीतील विषय क्रमांक, १२ महिन्याच्या ग्राफसाठी सुरवातीचा महिना आणि वर्ष एवढे द्यावे लागते. याने त्या व्यक्तिला त्या विषयात शुभ व अशुभ काल निश्चीत

काढून ते ग्राफच्या स्वरूपात दिसतात. तारखांच्या स्वरूपातही पाहता येतात. ग्राफिकच्या ४३ विषयांची यादी पाहून व्यक्तिच्या प्रश्नाशी, हेतुशी संबंधीत असे विषय क्रमांक निवडून वापरायचे असतात. माहिती देताच काही सेकंदात ग्राफ तयार होतो. (मानवी क्षमतेने हा ग्राफ काढायला वर्ष ही लागू शकते) आणि केवळ आठ दहा मिनीटात लेखी मार्गदर्शन देताही येते. हे ग्राफ मधील कालावधीचे शुभत्व -अशुभत्व हे त्या व्यक्तिच्या प्रारब्धाच्या प्रभावानुसार असते. विषयाची सुरवात झालेची/केलेची तारीख अशुभ असेल तर प्रारब्धाचा प्रभाव प्रतिकूल असतो. त्यामुळे भावी काळात त्या विषयाची/कृतीची फले अनिच्छनीय म्हणजे विलंब, अडथळे, नुकसान, अपयश या तऱ्हेची असतात. तारीख शुभत्वात असेल तर त्या विषयाची भावी काळात मिळणारी फले लाभ, यश अशी इच्छनीय असतात. खाली **दैनंदिन जीवनातील काही उदाहरणे** देत आहे.

**उदा.क्र. १** : विषय- अमेरिकेचा व्हिसा मिळण्यासाठी अर्जा संबंधी. जन्म तपशील ५.६.१९४७, वेळ १४.१५, जन्म ठिकाण अक्षांश १७-३२ उ., रेखांश ७३.३१ पू.

**घटना** : हे सुस्थितीतील निवृत्त गृहस्थ भारतात आहेत. एकच मुलगा, तो अमेरिकेत सहकुटुंब रहात होता. त्याला भेटायला जाता यावे म्हणून यू.एस. व्हिसासाठी अर्ज केला होता. फक्त भेटायला जायचे होते, पण व्हिसा नाकारला गेला. व्हिसा नाकारण्याची कारणे कधी दिली जात नाहीत. पण नको असणार्या वर्गातील व्यक्ती अमेरिकेत स्थायिक होण्याचा प्रयत्न करते आहे असे त्यांना वाटले की व्हिसा दिला जात नाही असे म्हटले जाते. आता ते एकटेच होते आणि पुन्हा अर्ज करायचा होता.

**ग्राफिकने दिलेले मार्गदर्शन-** त्याच्या संबंधील ग्राफचे विषय नंबर म्हणजे कौटुंबिक सुख (२१) आणि स्थलांतर (२३). यांच्या या दोन्ही विषयात एकत्रित शुभ असलेले कालावधी त्यांना काढून दिले आणि त्या मुदतीत अर्ज करावयास सांगितला.

**केलेली कृति आणि मिळालेले फळ-** बरेच महिने गेले. त्यांच्या हातात व्हिसा पडल्यावर तसे मला त्यांनी कळविले. एक लक्षात घ्या, की पुन्हा अर्ज करताना त्यांची परिस्थिती तशीच होती व पूर्वीचाच हेतु होता. परंतु यावेळेस ग्राफनुसार शुभ कालावधीत अर्ज केला आणि यश आले. असे योग्य मार्गदर्शन के.पी.ने देता येत नाही असा माझा अनुभव आहे.

**उदा. क्र. २**: विषय : जागेत सुख लाभत नाही. एक गृहस्थ स्वकमाईच्या फ्लॅटमध्ये रहात होते. पण तो लाभत नाही, सातत्याने कौटुंबिक स्वास्थ्य तेथे लाभत नाही असे त्यांना वाटत होते. काय करावे हा प्रश्न होता. जन्म तपशील: ज.ता. १३.१.१९६३, पहाटे ५.३० आयएसटी, १२.५८ उ. ७७.३६ पू.

ग्राफिकने विश्लेषण :- या संबंधातील ग्राफचे विषय म्हणजे १२-२ स्वकमाई पॉपर्टी, २१ कौटुंबिक सौख्य. फ्लॅटचे अॅग्रीमेंट केल्याने मालकी प्राप्त होते. म्हणून ती तारीख या विषयाची सुरुवात होण्याची तारीख ठरते. ही तारीख २१ नं. ग्राफमध्ये शुभ असेल तर त्या फ्लॅटमध्ये निवास करताना कौटुंबिक सुख मिळते. ही तारीख २१ नंबरच्या ग्राफमध्ये अशुभ कालावधीत होती. त्याना आलेले अनुभव आणि ग्राफचे निर्णय पूर्ण जुळले आहे. (अशाच गोष्टी विवाह करताना होत असतात. ) याच वेळी ही तारीख ३६ या अर्थप्राप्तीच्या ग्राफमध्ये तपासली. आता फ्लॅट साठी केलेला खर्च हा ३६ नंबरच्या ग्राफमध्ये शुभ होता म्हणजे किमान आर्थिक नुकसानीचा भाग नव्हता. या ३६ मधील शुभत्वामुळे हा फ्लॅट त्यानी विकला त्यावेळी त्याला चांगली किम्मत आली नी नुकसान झाले नाही. त्यांनी आणखीही एक दुसरा फ्लॅट खरेदी केला होता त्याची अॅग्रीमेंटची तारीख २१ नंबरच्या ग्राफमध्ये शुभ होती. म्हणजे या प्लॉटमध्ये राहून त्याना कौटुंबिक सौख्य लाभू शकते.

**उदा. ३** : विषय- होमलोन. जन्म तपशील : ता. १९.९.१९८२, वेळ १९.५४, आयएसटी., ठिकाण १८.५८ उ. अ., ७२.५० पू.

संदर्भ- या व्यक्तिला स्वत:ची बचत अधिक बॅंकेचे कर्ज काढून स्वत्र:ला राहण्यासाठी फ्लॅट घ्यावयाचा होता. यांनी फ्लॅट पसंत केला. थोडी रक्कम घेउन बिल्डरने अॅग्रीमेंट केले. उत्पन्न, हप्त्याची रक्कम इ. कर्जाच्या अटीत बसत होते. बॅंका कर्ज देण्यास हो हो म्हणत होत्या, ४-६ दिवसात होईल म्हणत असत. पण सर्व आवश्यकता पूर्ण केल्यावरही विलंब होत होता. बॅंकेच्या अटीत बसत असूनही घरकर्ज मिळायला विलंब होत होता. असे २-३ बॅंकाबाबत झाले होते. पण बिल्डर फार काळ थांबायला तयार नव्हता. कर्ज मिळून फ्लॅट घेता येईल ना? कर्ज फिटेल ना? असे प्रश्न होते.

प्रश्नाशी संबंधित असे ग्राफचे विषय- स्व कमाईची प्रॉपर्टी १२.२, कौटुंबिक सौख्य २१, धनहानी/कर्जव्याप ४१ हे आहेत.

**ग्राफिकने दिलेले मार्गदर्शन-** अ) त्यांना १२.२ आणि ४१ या दोन ग्राफचे समान शुभ कालावधी देऊन त्यातच कर्जासाटी अर्ज करा असे सांगितले. ब) रहायला जाण्यासाठी १२.२ आणि २१ चे समान शुभ कालावधी काढून दिले.

**केलेली कृति आणि मिळालेले फळ-** त्यांनी त्या शुभ कालावधीत वेगळ्या संस्थेकडे घरकर्जा साठी अर्ज केला. विशेष म्हणजे बिल्डरनेच ही संस्था सुचवून कर्ज मंजुरीसाठी मदत केली. शुभत्वामुळे कर्ज सत्वर मंजूर झाले, बिल्डरला बाकी रक्कम मिळाली आणि खरेदी पूर्ण झाली. तसेच दिलेल्या शुभ कालावधीत ते फ्लॅटमध्ये रहायला गेले आणि सुखात आहेत.

**यातील विशेष गोष्ट** पहा. या पती-पत्नी दोघांच्या नांवावर व्यवहार होता.एकाची कंपनी अन्यत्र गेल्यामुळे त्याची नोकरी गेली. एकाच्या पगारात घरखर्च व कर्जाचा हप्ता भरणे कठिण होत होते. कर्जफेड चालू राहून फ्लॅट राहील ना याची चिंता वाटू लागली. पण ग्राफच्या शुभत्वात रहावयास गेल्या मुळे काही महिन्यातच दुसरी नोकरी मिळाली नी एकाचा पगार कर्ज फेडीस जात राहिला. ४१ च्या शुभ कालावधीत कर्ज काढले की ते निश्चितच फिटते हा अनुभव आला. ग्राफ मधील कालावधीचे शुभत्व - अशुभत्व प्रारब्धनिष्ठ असतात याचे हे उदाहरण म्हणता येते.

टीप- कृष्णमूर्ती पद्धतीत त्यानी कर्ज केव्हा काढले असता फिटेल त्याचे काळ कसे काढावे याविषयी लिहिले आहे. त्याबाबत कोणाचा अनुभव वाचनात नाही. त्याला वेळही लागतो.

जीवनमार्गदर्शन पध्दतीत मार्गदर्शन हे सुलभतेने ग्राफच्या प्रारब्धनिष्ट अशा कालावधी व होरा शास्त्राचे नियम यांच्या संयोगाने मिळत असते. यात भविष्य कथन नसते पण जे काही सांगीतले जाते ते अचूक, उपयोगी पडत असते नी नुकसान होत नाही. होरा शास्त्राचा नियम असा आहे ''व्यक्तिच्या त्या विषयाच्या अशुभ कालावधीत विषयाची सुरवात झाली (किंवा केली) तर त्या विषयाची भावी काळात मिळणारी प्रारब्धनिष्ट फळे ही गोळा बेरीज करता अशुभ, अनिच्छनीय म्हणजेच विलंब, अडथळे, नुकसान, अपयश या प्रकारची असतात. जर शुभ कालावधीत सुरवात असेल तर याचे उलट असते, गोळाबेरीज करता पुढील काळात नुकसान/कष्ट न होता सुख मिळते. हाच खरा ग्राफचा उपयोग असतो.

अधिक माहितीसाठी संदर्भ :

१) जीवनमार्गदर्शन - मार्गदर्शनार्थ प्राचीन शास्त्र व विज्ञान यांचा संयोग भाग १ हे १७३ पानी पुस्तक. लेखक डॉ. दादा गाडेकर व विजय म्हैसकर.

२) 'कृष्णमूर्तीपध्दती आणि जीवनमार्गदर्शन यात खूप साम्य आणि थोडे फरक आहेत' हा नक्षत्राचे देणे दिवाळी २०१२ मधील मधील लेख. लेखक डॉ. दादा गाडेकर आणि विजय म्हैसकर. जरूर वाचा.

३) या शिवाय आजवर के.पी पध्दतीवर आमचे आलेले लेख हवे असतील तर एसएमएस ने ०९४२३०३३६१९ वर किंवा ड्रेऋहंकमांत/तमकपर्ष्टिंपसण्बवउ वर ईमेल आय. डी. पाठवून आमच्याकडून मागवून घ्यावेत. येथेच आजवर पसिध्द झालेले संशोधनात्मक लेख, पुस्तके, सॉफ्टवेअरच्या मागणीसाठीही संपर्क साधा. ३६ ग्राफच्या वार्षिक फलाच्या रिपोर्टची माहितीसाठी प्रकरण ४ पहा.

ले. विजय म्हैसकर, मोबा. ०९८६७३९९८७०, ईमेल vijay249@hotmail.com

## लेख नं. ७८ - ज्योतिष व्यासंगीना आव्हान व आवाहन

जातकाने आपल्या जन्म तारीख, वेळ, गांव या शिवाय, जीवनातील जो प्रश्न विचारायचा आहे त्या संबंधीच्या घटना, कृतीचा प्रारंभ यासंबंधीत तारखा द्याव्यात म्हणजे योग्य मार्गदर्शन होईल अन्यतः नाही. किंबहुना तुम्हाला जर ज्योतिषशास्त्राचा व्यासंग असेल तर जीवनातील महत्वाच्या घटनांच्या नोंदी करण्याची सवय ठेवावी कारण त्या तारखा जन्मतारखेच्या रेकॉर्ड इतक्याच महत्वाच्या आहेत. २०१३ मध्ये ठेवलेल्या भारत सरकारच्या निर्णयांच्या नोंदीची छाननी लेख नं. ६९ आणि ७६ मध्ये दिलेली आहे त्यातील ६० घटना जुळल्याचे दिसून येते. एकाच पत्रिकेवरून इतक्या सर्व घटना केवळ दोन शुभ/अशुभ नियमांच्या आधाराने बरोबर आल्याचे कोणत्याही पध्दती नुसार दाखवून द्यावे ही विनंती आहे.

**उदाहरण १- वाहन विषयी.**

घटना --  एक मोपेड दुचाकी विक्रेता माझ्या ओळखीचा होता. त्याने एक योजना मला सांगितली की ''टीव्हीएस, लूना वगैरे लहान गाड्यांच्या विक्रीसाठी मला ग्राहके मिळवून दिलीस तर मी प्रत्येक गाडीमागे काही कमिशन तुला देईन.'' मला ही योजना पूर्णत्वाने मान्य नव्हती, पण मी त्याला म्हटले, ''घेणाय्राच्या किमतीतून काढलेल्या रक्कमेचा मोबदला मला नको आहे. एकदम तुझ्या एकाच वेळी १० गाड्या विकल्या गेल्या तरी शीघ्र विक्रीमुळे तुझे फायद्याचे प्रमाण वाढणार आहे. तर मी जे १० जण सुचवणार आहे त्याला बाजार भावाच्या विक्रीपेक्षा कमी दरात तू गाडी द्यावी आणि एका लॉटने १० गाड्या गेल्यामुळे गाड्यात गुंतलेले पैसे सत्वर मोकळे होतील. यातून होणाय्रा  फायद्यातून मला घ्यावयाच्या माझ्या गाडीत मला सूट ध्यावी. सूट किती द्यायची ते तू ठरव.''

ही योजना त्याला मान्य झाल्याने महिन्यात आम्ही ११ गाड्यांची मागणी नोंदवली आणि <u>एकाच दिवशी सर्वांची डिलेव्हरी केली</u>. रेकॉर्ड ठेवायची सवय असल्याने त्या १० जणांचे जन्मतारखेचे रेकॉर्ड, शिवाय कोणाच्या गाडीचे पुढे काय झाले, अपघात, आदी मी माझ्याकड नोंदून ठेवले होते. संशोधनच करायचे म्हणजे सर्व नोंदी ठेवायलाच हव्यात.

पुढे १९९५ मध्ये मी केलेल्या संशोधनाला काही सिध्दता लाभली आणि सॉफ्टवेअरच्या माध्यमातून ही केस मी तपासली. तपासणी विषयाचे ग्राफ नं. १३ - वाहन, १९ - शरीर सुख, २१ - कौटुंबिक सुख, ३१ - व्यवसाय, ३६ - आर्थिक.  या विषयांच्या ग्राफचा वापर पुढील प्रमाणे केला आहे.

<u>तपासणीत जे निघाले त्याचा तपशील</u> (१) जी व्यक्ति मयत झाली त्याचा १३ वाहन, १९ तब्बेत आणि २१ कौटुंबिक हे तिन्ही ग्राफ गाडी ताब्यात घेण्याचे दिवशी अशुभ होते. अपघातामुळे या तिन्ही विषयाच्या सुखाला तो मुकला आहे. (२) पाच लोकांना ही गाडी घेताना १३ वाहन ३६ आर्थिक या दोन विषयासाठी अशुभत्व होते. या पाच जणांना गाडी चांगली लाभली नाही असा त्यांचा समज होता. सारखी दुरूस्ती आणि त्यावर होणाय्रा खर्चामुळे हे सर्वजण त्रासले होते. ज्यामुळे एकाची गाडी भंगाराला गेली तर काहीना त्यांची गाडी कटवणे योग्य वाटले. (३) काहीना गाडी घेताना १३, ३१ व्यवसाय, ३६ आर्थिक अशुभ असल्याने पैशाचे नुकसान आणि  गाडीचा लाभ न होणे ते तोटे झाले. व्यवसायासाठी हातभार होईल ही अपेक्षा ठेवली होती त्यात अपयश आले. (४) याच पैकी काही जणांना १३, १९, २१ ग्राफ अशुभ होते. त्याना अगर त्यांचे आप्ताना अपघाताने दुखापतीचा त्रास झाला. त्यापैकी काहीनी अपशकुन या नात्याने गाडी विकून टाकली. (५) एकाला वरील दिलेल्या ग्राफ पैकी फक्त १३ अशुभ होता व बाकी सर्व ग्राफ शुभ होते तरीही त्यांनी गाडी विकली. यात गाडीचा दोष नव्हता पण विकण्याचे कारण मोपेडची गती कमी असते. मित्रवर्गात गतिमान मोठ्या दुचाकी होत्या,  त्यामुळे त्याचे आकर्षण होअून ही विकून नवीन घेतली.

वरील विषयांचे शुभ अशुभत्व आणि त्यानुसार लाभलेली फले अचूक आलेली आहेत हे सविस्तर सांगण्याची गरज नाही. गाडी खरेदीच्या दिवशीचे पंचांग फल सर्वांचे एकच आले असते आणि सर्वांसाठी गोचरी एकच आली असती पण प्रत्यक्षात सर्वाचे फल नोंदीप्रमाणे भिन्न आहे हा प्रमुख फरक मुहूर्तासाठी केवळ पंचांगाचा वापर करणारांनी लक्षात घ्यावा कारण पंचांगाचे मुहूर्त व्यक्तिनिष्ठ नसतात. ज्या विषयाचे सुख लाभणार नव्हते तो ग्राफ गाडी घेताना अशुभ होता हे सर्व वरील प्रमाणे स्पष्ट झाले आहे.

**<u>उदाहरण २</u> पहिला <u>व्यवसाय तोट्यात, पण नवा फायद्याकडे</u>** –

या प्रकारचेच दुसरे एक उदाहरण १९९५ च्या दरम्यानचेच आहे. एका परिचित व्यक्तिने मला मार्गदर्शनार्थ बोलावले होते. त्या व्यक्तिची जन्म तारीख  १३/१०/१९५८ जन्मवेळ १०.०२, ज. ठिकाण २१.१२ उ.अ. ७२.५२ पू. रे. + ५.३० तास.

***प्रश्न संदर्भ***- त्या व्यक्तिचे किर्लोस्कर, कूपर इंजीने, तत्सम मशीनरी आणि त्या मशीनरीचे सर्व प्रकारचे स्पेअरपार्ट विक्रीचे त्यांचे दुकान होते. त्यांनी हा व्यवसाय १०/३/९० मध्ये वडिलार्जित जागेत सुरू केला होता. हा व्यवसाय कर्ज काढून, भरपूर भांडवल घालूनही लवकरच अडचणीत आला होता. त्यांनी एका वाक्यात मला विनंती केली की ''या कर्जातून मला लवकर बाहेर काढा''.

<u>ग्राफिकने विश्लेषण</u>- संबंधित ग्राफ विषय आहेत १२/१ प्रॉपर्टी (पूर्वीर्जित), ३१ व्यवसाय, ३६ आर्थिक, ४१ आर्थिक नुकसान. हे सर्व ग्राफ त्या १०/३/९० तारखेला अशुभ होते. त्यामुळे ३१ आणि ३६ हे दोन ग्राफ अशुभ असल्याने धंदा चांगला चालला नाही नी मिळकतही झाली नाही. ३६ आणि ४१ अशुभ असल्याने कर्ज काढले ते फिटले नाही. १२.१ ही पूर्वार्जित प्रॉपर्टीत व्यवसाय सुरू करताना अशुभत्व असल्याने ही प्रॉपर्टी लाभदायक ठरली नाही.  तात्पर्य हे प्रारब्धनिष्ठ ग्राफ ते दुकान सुरू करीत असताना शुभ असते तर या अडचणी आल्या नसत्या असा त्याचा अर्थ आणि अनुभव आहे.

**ग्राफिकने दिलेले मार्गदर्शन-** १९९६ ला मी मार्गदर्शन करीत असताना त्याना बराच बदल सुचविला. आम्ही दिलेल्या शुभत्वात नवीन व्यवसाय सुरू करावा लागेल, दुकानाची जागा, दुकानातील व्यवसायाचे स्वरूप, आणि शक्य झाले तर दुकानाची मालकी यात बदल करून दुसरा व्यवसाय सुरू करावा लागेल. तुमच्या अभ्यास आणि आवडीप्रमाणे नवा व्यवसाय तुम्हीच निवडायचा आहे असे सांगितले. यात दुकानाचे तोंड बदलणे, गल्ल्याची जागा/दिशा बदलणे, पत्नीच्या नावाने पाटी लावणे वगैरे सायन्स आणि ज्योतिषशास्त्र बाह्य उपाय आमच्या पध्दतीत मान्य नाहीत. मी त्याना वरील सर्व विषयांचे पुढील शुभ कालावधी काढून दिले.

**केलेली कृति आणि मिळालेले फळ-** शेवटी चुलत भावाची जागा नवीन दुकानासाठी घेतली, मी दिलेल्या वरील सर्व विषयांच्या शुभ कालावधीत इंजिन विक्री ऐवजी त्यांच्या अभ्यास आणि आवडीनुसार बांधकाम वस्तू विक्रीचे हार्डवेअरचे दुकान २६/१२/१९९६ रोजी सुरू केले. दुकानाचे नांव बदलले पण मालकी मात्र त्यांचीच ठेवली. जुनी इंजिने आदि एका कोपर्‍यात ठेवून दिली व खपेल तशी संपवली आणि पुढे उर्वरीत सामान कंपनीला पाठवून दिले.

हे दुकान सुरु केल्यापासून तीनचार वर्षातच सर्व कर्ज फिटून नीटनेटका व्यवसाय झाला. वडिलांच्या बरोबर त्यांच्या मुलाने ती पूर्वीची जुनी जागा होती त्यात आमच्या पध्दतीनुसार कापडाचे दुसरे दुकानही शुभत्वात सुरू केले आणि सर्व काही व्यवस्थित आहे. आमचे ओळखीचे रूपांतर घनिष्ठ मैत्रीत झाले.

हे करायला येथे फारमोठा खटाटोप करायचा नसून फक्त शुभत्वाचा वापर करायला आहे. ना इकडे तिकडे लिंबे टाका ना मोठा धार्मिक विधी करा. येथे पत्रिकेची छाननी करण्यासाठी शास्त्र अभ्यासाचा, लक्षात असलेला अपुरे स्मरणाचा वापर येथे बिलकुल करावयाचा नाही. किंबहूना लाखो फलिते आणि हजारो नियम तोंडपाठ ठेवण्याची अशक्यप्राय बाबीची गरज नाही नी त्यामुळे जन्मपत्रिका ही पाहण्याची अवश्यकता येथे नाही. विषयवार मिळालेल्या तारीखवार शुभ अशुभत्वा नुसार घटना तारखेला त्या विषयापाठीशी असलेले केवळ त्या व्यक्तीचे प्रारब्धनिष्ट इष्टानिष्ट अनुमान चटकन समजते. हे अनुमान घटनेचे भावी काळात होणार्‍या परिणामाशी निगडित असल्याने त्यावरून त्या घटनेचे भावी परिणामांचा मागोवा घेता अचूक मार्गदर्शन करता येते. यातून एका पत्रिके साठी दहा जणांची दहा मते होत नाहीत आणि ज्योतिषाला स्वत:चे मनचे वेगळे काही सांगण्याची गरज नसल्याने अनाठाई चार्टींग होत नाही व जातकाला अचूक लाभ होतो.

या पध्दतीचे मार्गदर्शन तुम्हाला आमची जीवनमार्गदर्शन प्रा. लि. ही संस्था अल्प खर्चात, लेखी उपलब्ध करून देण्यास तयार आहे. तुमच्या कॉम्प्युटरवर 'टीमव्हूअर' सॉफ्टवेअर आणि इंटरनेट असले की त्याच्या साहाय्याने आमच्याकडे न येता तुम्हाला तुमच्याच घरी बसून कॉम्प्युटरवरून 'ग्राफ ची' खात्री करून घेता येईल. तुम्ही 'ग्राफिक' सॉफ्टवेअर खरेदी केल्यावरही ते कसे वापरायचे व इतर शंका समाधान हेही घरबसल्या आमच्याकडून होईल. मला ज्योतिषशास्त्राचे निर्णय ९० टक्के अचूक येत असतात हे विज्ञान छाननीने सिध्द करण्यात यश आलेले आहे. हा प्रयोग आजवर कोणी केल्याचे आढळले नाही. ज्योतिषशास्त्राचे खरेपण सिध्द करताना मी केवळ जुळणार्‍याच केसेस घेऊन रिसर्च प्रसिध्द केलेले नसून सरसकट मिळालेल्या सर्वच केसेस एकत्रित घेऊन त्याचे निर्णय ९० टक्के अचुक कसे येतात हे सिध्द कलेले आहे. हे रिसर्च आमच्या साईटवर डाउनलोड विभागात अनु. नं. १२, १३ आणि १५, १७, २०, २३ वर ठेवले आहेत ते अभ्यासावेत.हा प्रयोग दुर्मिळच आहे.

या सर्व बाबींचा साकल्याने आणि विज्ञान विचारसरणीनुसार स्वीकार करून जन्म पत्रिकेवरून भविष्य अगर मार्गदर्शन करण्या ऐवजी प्रत्येकाच्या जीवनांत घडलेल्या, घडविलेल्या घटनांचा जन्मपत्रिकेतील आणि गोचरी ग्रहरचनेनुसार मागोवा घेण्याची पध्दत सर्व ज्योतिष अभ्यासकांनी स्वीकारावी म्हणजे चुकीचे मार्गदर्शन दिले जाणार नाही. हेच आमचे आव्हान आणि आवाहन आहे.

ले. डॉ. दादा गाडेकर
मोबाइल ९४२३०३३६१९

# प्रकरण ३

## अनेक लेखातील केसेसचे ‘ग्राफिक’ ने केलेले विश्लेषण अचूक.

‘ग्राफिक चे निर्णय कसे अचूक असतात, म्हणजे घटनांचे पुढील काळातील झालेले परिणाम आणि ग्राफने दर्शविलेले प्रारब्धीय फळांचे स्वरूप कसे जुळतात, हे या भागांत अनेक विषयांच्या उदाहरणानी स्पष्ट केले आहे. यासाठी मुख्यत: अन्य लेखकांच्या लेखातील अशा घटना घेतल्या की ज्यामध्ये आवश्यक ती माहिती आणि पुढील परिणाम दिलेले आहेत. या घटनांच्या तारखा योग्य विषयांच्या ग्राफमध्ये तपासून ग्राफचे निर्णय दिले आहेत. लेखाच्या प्रकाशनाचा संदर्भ दिला आहे. व्यक्तींचे जन्म तपशील मूळ लेखात आहेत, काही ठिकाणी ते घेतलेले नाहीत. तरीपण मूळच्या लेखात आपण पाहू शकता. लेखातील घटनावरून ग्राफिकच्या संबंधीत विषय निवडले आहेत. लक्षणीय बाब ही आहे की घटनेचे पुढील काळात झालेल्या परिणामांचे चांगले- वाईट स्वरुप, घटनेच्या किंवा विषय सुरु होण्याच्या तारखेलाच ग्राफने ते अचूकपणे दर्शविले आहेत. घटना विविध विंषयांच्या आहेत. ज्यांच्या जीवनात काही विषयात मोठी अडचण आहे, अशा व्यक्तींना ग्राफिकच्या अचूक, उपयुक्त मार्गदर्शनाचा मोठा उपयोग होउ शकतो. हे पूर्ण मूळ लेख मराठी आणि इंग्लिश मध्ये आमच्या साईटवर डाउनलोड विभागात पाहता येतील. लेखाचे तेथील अ. नं. आणि शीर्षक हे तसेच ठेवले आहेत.

(प्रकरण १ मध्ये ‘ग्राफिक’चा आधार केवळ प्राचीन शास्त्र आहे हे सविस्तर दिले आहे. तसेच ग्राफ म्हणजे काय, त्याचे ४३ विषय, प्रश्न सोडविण्यासाठी कोणते विषय निवडायचे, एकाहून अधिक विषयांनी उत्तराची अचूकता का वाढते आदि स्पष्ट केले आहे, ते लक्षात घेउन हाही भाग वाचावा)

या भागात खालील लेख आहेत. लेख क्रमांक हे वेबसाइट अनुक्रमणिकेनुसार आहेत. पूर्ण लेखासाठी वेबसाइट वरील इंडेक्स फाईल मधील JM_10M10 पहा. फाईल साईट वरून डाउनलोड करून वाचू शकता.

लेख क. ०१ - ज्योतिषशास्त्रीय अचूकता
लेख क्र.०३ - अपघात आणि विवाहयोग एकाच वेळी ?
लेख क्र. ११ - एकाच जीवनातील अचूकपण
लेख क्र. १२- गाथा ग्राफची
लेख क्र. ७९- लाखो रूपयाचे नुकसान वाचवून तेवढाच फायदा करून देणारे ग्राफिक.

### ३.१ लेख नं. १ - ज्योतिषशास्त्रीय अचूकता, लेखक - दादा गाडेकर.

ग्राफ विषयी तुम्हाला नियम सांगितलेले आहेतच. आता त्याच नियमानुसार येथे विवेचन करणार आहे. या लेखात एकूण १ ते ३९ घटना घेतल्या आहेत. ग्राफ मूळच्या लेखात दिलेले आहेत
‘स्मरणिका’ हा के. पी. च्या २७ ते २९ ऑक्टोबर ९८ चे मुंबई संमेलनाचा अंक.

नं. १) या अंकातील पान नं. १३१, लेखक डॉ. जयश्री कान्हेरे :- प्रेमभंग झाल्याने जातकाने दि. २०/६/९४ स्वत:वर गोळ्या झाडून आत्महत्या केली. मृत्यू म्हणून १९ शारिरीक ग्राफ तपासला त्यात ही तारीख अशुभत्वात आहे. ग्राफचा निर्णय बरोबर आहे.

नं. २) हा देखील ग्राफ वरील नं. १ मधील जातकाचाच आहे. आत्महत्येचे कारण मानसिक वैफल्य असल्याने येथे ४२ चा ‘मानसिक विकलता’ ग्राफ घेतला आहे. यातही २०.६.९४ रोजी अशुभत्व असल्याने मानसिक विकलतेचा प्रभावाने ही घटना घडली आहे. ग्राफचा निर्णय बरोबर आहे.

आता घेउ ‘ज्योतिष ज्ञान’ दिवाळी अंक २००१

नं. ३) लेखक : श्रीकांत लष्करे. पान नं. ८९, यांच्या कुंडली १ च्या जातकाचे ९.११.९९ रोजी मणक्याचे ऑपरेशन झाले. नंतरही तीन ऑपरेशन्स करावी लागली. १९ शारिरीक या ग्राफमध्ये ९.११.९९ तारीख अशुभ आहे. ऑपरेशनने व्याधी पुरी दूर व्हायला हवी, ते झाली नाही. ग्राफचा निर्णय अचूक आहे.

नं. ४) वरील लष्करे यांनी दिलेल्या दुसऱ्या जातकाचे मणक्याचेच दुखणे १२/२/०१ रोजी सुरू झाले पुढे दुखणे पूर्ण बरे झाले नाही ग्राफने १९ - शारिरीक मध्ये या तारखेला अशुभत्वच दर्शविले आहे.

नं. ५) याच 'ज्योतिंष ज्ञान' मध्ये पान नं. ९५, ले. बेनुसकर. जातकाच्या किडनी स्टोनचे दुखणे सप्टे.१९७८ मध्ये सुरू झाले संपूर्ण सप्टेंबर १९ च्या शारीरिक मध्ये अशुभत्व होते. ही व्याधी कायमची असणे किंवा काही वैगुण्य राहणे ग्राफ सुचवतो.

नं. ६) याच 'ज्योतिष ज्ञान' अंकांत श्री. मारटकर यांनी दिलेली केस. या स्त्रीचे स्तनाच्या कॅन्सरचे ऑपरेशन डिसेंबर ९९ मध्ये झाले आज पेशंट ठणठणीत आहे. ऑपरेशनची कृती तारीख १९ च्या शारीरिक मध्ये शुभ असल्याने त्याचे चांगले परिणाम होतील असे ग्राफने दर्शविले आहे ते अचूक आहे.

नं. ७) वरील श्री. मारटकरांच्या लेखातील कुंडली क्र. ४ चे पान नं. ९९ वरील दुसरे उदाहरण आहे. याही जातकाला स्तनाचा कॅन्सर होवून ऑक्टो. २००० मध्ये ऑपरेशन केले. व्याधी बरी झाली. पूर्ण ऑक्टोबर महिन्यात १९ नबर शुभ आहे. शुभत्वात ऑपरेशन झाल्यामुळे त्याचे परिणाम चांगले आले आहेत हे ग्राफने बरोबर दर्शविले आहे.

नं. ८) एका अंकातील पान नं. १०६ वर आदरणीय श्री. श्री. भट यांनी, पत्नीशी पटत नसलेल्या जातकाची विवाहाची तारीख २६/५/५९ दिली आहे. विवाहाची तारीख ही संतती/कौटुंबिक जीवनाची जन्मतारीख असते. ४ विवाह योग ग्राफमध्ये ही तारीख अशुभ आहे. त्या व्यक्तिला मतभेद, आजारपण, गर्भाशयाचे आजार आदि ताप झाले, म्हणजे वैवाहिक सुखात कमतरता, ती ग्राफने बरोबर दर्शविली आहे. पंचाग अगर विशोत्तरीच्या शुभत्वात विवाह करण्यापेक्षा तो ग्राफ नुसार करावा.

<u>आता आपण श्री. कामत यांच्या 'ब्रह्मज्ञान' २००१ दिवाळी अंकात.</u>

नं. ११) या अंकातील पान नं. ४९ च्या पेडणेकरांचा लेख प्रेमाच्या बसाबसीचा विषय म्हणून ४ नंबरच्या विवाह योग हा ग्राफ घेतला. मागणी ८.२.१९९७ आणि प्रेमाला होकाराची तारीख ३/३/९७ साधारण अशुभ असल्याने विवाह विलंबाने २०/५/०१ रोजी झाला.

नं. १२) याच लेखात पान नं. ५०. मुलाच्या पत्रिकेनुसार होकाराची तारीख ५/१०/९३ ही ४ नंबरच्या विवाहासंबंधीत ग्राफमध्ये साधारण अशुभ असल्यामुळे याचाही विवाह उशीरा डिसेंबर २००० मध्ये झाला.

नं. १३) वरील १२ प्रमाणेच या मुलीचा होकार ५/१०/९३ ही तारीखेचा ग्राफ अशुभ असल्याने तिला विवाहासाठी सात वर्षे वाट पहावी लागली आहे. ग्राफमध्ये काहीतरी निश्चित तत्थ आणि अचूकता असल्यानेच सर्व उदाहरणे जुळतात.

नं. १४) याच अंकातील ६० पानावरील श्री. विनय अध्यापक यांच्या लेखातील क्ष व्यक्तीचे लग्न ३०/११/९२ रोजी आणि घटस्फोट २१/१०/९९ रोजी झाला. लग्नाची तारीख ४ विवाह ग्राफमध्ये अशुभ आहे. त्यामुळे विवाह सौख्यात कमतरता राहणार आहे. ग्राफ निर्णय अचूक आहे.

नं. १५) वरील क्ष व्यक्तीच्या घटस्फोटाची तारीख २१/१०/९९ ही कौटुंबिक सुखाचा २१ नंबरचा ग्राफमध्ये शुभ आहे. यामुळे दुसरा विवाह १५/७/२००० रोजी झाला. ग्राफ निर्णय अचूक आहे.

<u>नोंद</u> -पहिल्या विवाहाच्या शेवटातूनच पुढील विवाहाची सुरुवात होउ शकते. म्हणून पहिल्या विवाहाचा शेवटही शुभ असणे गरजेचे असते. तर त्या विषयात पुढील वेळी सुख लाभत असते.

नं. १६ नं. २३/७०. सुनील गोंधळेकर यांनी एका जातकाचा विवाह ९/२/२००१ पर्यंत विवाह होईल असे सांगितले व विवाह १५/२/२००१ रोजी झाला. आमच्याकडे भविष्य नाही त्या मुळे विवाह केव्हा होईल हा ग्राफचा निर्णय नाही. पण ग्राफमध्ये ही विवाहाची तारीख शुभत्वात आहे. त्यामुळे जातकाला विवाहाचे सुख चांगले लाभावे हा शास्त्राचा हेतु सफल होतो, हा फरक लक्षात घ्यावा.

<u>आता प्रभुणे यांच्या 'सुखसंवर्धक ज्योतिषशास्त्र' दिवाळी २००१ अंक याकडे वळू.</u>

नं. १७) या अंकांत पान नं. ७२ वर मा. केशकामत यांनी हाडांच्या यशस्वी ऑपरेशनची तारीख ८/११/९७ दिली आहे.ती १९ शारिरीकच्या शुभत्वात ऑपरेशन झाल्याने ते यशस्वी होणार हे ग्राफने अचूकपणे दाखवले आहे.

<u>आता सोलापूर ज्योतिष अधिवेशनाच्या 'वेदचक्षू' अंका कडे वळू या.</u>

नं. १८) यांत पान नं. ५३ वर डॉ. दिवाकर यांनी जातकाच्या जन्म २.११.२००१ आणि सहा दिवसांनी आईचा मृत्यू ८.११.२००१ ला झाल्याचे दिले आहे. आता जातकाचा जन्म २/११/२००१ ही तारीख तिसऱ्या व्यक्तिच्या म्हणजे वडीलांच्या पत्रिकेनुसार पाहू. वडिलांच्या ग्राफ १५ संतती मध्ये २.११.२००६ तारीख शुभत्वात आहे. त्यांना मुलगा झाला ही आनंदाची गोष्ट ग्राफने योग्य रीतीने दाखवला आहे. यात आमच्या पध्दतीत भविष्य पध्दतीने 'केव्हा होईल' या पेक्षा 'बाळाचे सुख मिळेल का' याचे मार्गदर्शन हे ध्येय असते. मुले होतात पण वयस्कपणी सांभाळीत नाहीत हे काय मुलाचे सुख झाले काय?

नं.१९) वरील मुलाच्या पित्याच्या पत्रिकेनुसार कौटुंबिक-वैवाहिक सौख्याचा ग्राफ पाहू या. या २१ नंबरच्या ग्राफमध्ये ८/११/०१ ही तारीख पूर्ण अशुभत्वात आहे आणि याच मुदतीत यांची पत्नीचा मृत्यू झालेला आहे. हे ग्राफचे अचूकत्व विचार करण्यासारखे नाही का?

नं. २०) यात अंकात पान नं. ६३ वर याच्या उलटची केस प्रा. संजय कुलकर्णी यांनी दिलेली आहे. २६/१/८८ रोजी जन्मलेल्या या जातकाच्या वडीलाना २७/८/८७ रोजी देवाज्ञा झाली. जातकाच्या पित्याचे सौख्य ३२ नंबरच्या ग्राफमध्ये पहाता येते, त्यात २८/८/८७ ही तारीख अशुभ आहे, म्हणजेच या सौख्यात उणीव आहे. ग्राफने हे अचूकपणे दाखवले आहे.

नं. २१) आता याच 'वेदचक्षू' मधील पान नंबर ६७ वर प्रा. कुलकर्णी यांनी जातकाचा जन्म ५/८/४४ व पित्याचा मृत्यू १५/७/४४ दिलेला आहे. जातकाच्या पितृसुखाच्या ३२ नंबरच्या ग्राफमध्ये स्टेपडाऊनचे अशुभत्व स्पष्ट असल्याने पितृसुखात उणीव ग्राफने अचूकपणे दाखवली आहे.

नं. २२) याच 'वेदचक्षू' चे पान नं. ७१ वर सौ. शरयू कुलकर्णी यांनी नोकरीचा ४/८/८० रोजी राजिनामा द्यावा लागल्याची तारीख दिलेली आहे. ग्राफमध्ये सोडताना विषयांत गंडांतराच्या घटनांचे अशुभत्व आहेच.

<u>आता 'नक्षत्राचे देणे - दिवाळी २००१ अंकाकडे वळू या</u>. विस्तारभयास्तव येथून पुढे केवळ आशय आणि सदंर्भाचा फक्त उल्लेख करीत विवेचन करणार आहे.

नं. २३ व २४) या अंकांत पान ७१ वर श्री. हेरंब खोले यानी संततीच्या जन्मांच्या तारखा दिल्या आहेत. दोन मुले झाली ती शुभत्वात होती पण नंतर जुळे झाले ती तारीख अशुभत्वात आहे. ती का अशुभ हे काळच ठरवेल.

नं. २५) याच अंकांत श्री. भरणे यांनी एका जातकाला ३१/५/७३ रोजी संतती झाल्याची तारीख दिली आहे. १५ च्या संतती या ग्राफमध्ये ती तारीख शुभ आहे. ग्राफचा निर्णय बिनचूक आहे.

<u>आता 'नक्षत्राचे देणे' चा वासंतिक अंक २००१ अंक पाहूया</u>. यांत भरपूर घटना आहेत. धन्यवाद.

नं. २६) या अंकांत आमचे बालपणचे सवंगडी श्री. विजय म्हैसकर यांनी एका जातकाची नोकरीची असाईनमेंटची, नोकरीची तारीख दिली आहे. ग्राफ मध्ये ३१ व्यवसाय ग्राफमध्ये १६/५ ते २३/५ अल्पसे शुभत्व आहे. याच काळांत २२/५/९९ रोजी असाइनमेंटचे काम झाले. अर्थात २४ तारखेनंतर अशुभत्व सुरू होत असल्याने त्या मुदतीत नोकरीचे केलेले अशुभत्वातले जॉयनींग दीर्घकाळ फायदेशीर ठरेल असे मात्र वाटत नाही.

नं. २७) याच अंकांत पान नं. १०४ वर श्री. अशोक भागवत यांनी एका जातकाच्या आईचा मृत्यू २/११/८० चे रेकॉर्ड दिले आहे. ११ या मातृ सौख्य ग्राफमध्ये ही तारीख अशुभ आहे, मातेच्या मृत्यूने ते सुख संपले हे फल मिळाले. हे फळाचे अशुभत्व ग्राफने बरोबर दाखवले आहे.

नं.२८) वरील अंकात पान नं. ३३ वर श्री केशकामत याचा लेख. या मुलीने पळून जावून परजातीच्या मुलाशी १६/१२/९८ रोजी रजिस्टर लग्न केलं या दिवशी ४ विवाह ग्राफ अशुभ असल्याने पटले नाही.

नं. २९) केशकामत यांनीच दिलेली दुसरी कुंडली या मुलीने पळून जावून १७/५/२००० रोजी रजिस्टर लग्न केले. तो पती आधीच विवाहित होता असे असूनही ४ विवाह ग्राफ अशुभ असल्यामुळे पहिला मुलगा असलेल्या पत्नीस सोडून हा पती या मुलीसहित पळून गेला.

नं. ३०) याच अंकांत पान नं. ७९ वर श्री. विजय दिघे यांचा लेख यात जातकाची पहिली नोकरी गेली तर दुसरी नोकरी मिळालेची १०/१२/२००० ही तारीख ३१ व्यवसाय या ग्राफमध्ये अशुभ असल्याने ती किती टिकेल कोण जाणे.

नं. ३१) याच अंकात बबन वाघोले यांनी ८६ पानावर दिलेल्या उदाहरणानुसार २/८/२००० रोजी हार्ट अ‍ॅटॅक, ४/८/०० रोजी बायपास सर्जरी. दोनही तारखा १९ च्या शारिरीक मध्ये शुभ असल्याने आरिष्ट टळले आहे.

नं.३२) याच अंकात पान नं. ९५ वर श्री. दिनानाथ जोशी यांनी देखील नोकरीचाच विषय दिलेला आहे.या स्त्रीस २८/६/०० रोजी ऑर्डर आणि नोकरीवर रूजूची १/७/०० दोन्ही ३१ मध्ये शुभ असल्याने चांगले झाले.

नं. ३३) सौ. प्रमिला दीक्षित यांचा लेख जातकाचा २१/१२/२००० रोजी विवाह झाला. ही तारीख ४ या विवाह ग्राफ मध्ये शुभ असल्याने चांगले सुख मिळेल.

नं. ३४ व ३५) याच अंकात श्री. जयसिंगराव चव्हाण यांनी आपल्याच मुलाच्या ऑपरेशनच्या तारखा दिल्या आहेत. त्यातल्या दोन केसेसचे मणक्याचे व गुड्याचे ऑपरेशन १९ शारिरीकच्या अशुभत्वात झाले. अपुरेपण राहिले आहे.

मिळतील तशा ३५ केसेसचा रिसर्च दिलेला आहे. सर्वच केसेसचा निर्णय ग्राफच्या सहाय्याने तंतोतत बरोबरच आलेला आहे हे तुम्हालाही समजलेले आहेच. अभ्यासुंच्या दृष्टीकोनातून ही दुर्लक्ष करण्यासारखी बाब मुळीच नाही

हे आपल्याला पटले असेलच. या ग्राफ पद्धतीत १) अचूक २) थोडक्यांत ३) व्यक्तीगत विचाराला थारा नसणे आणि ४) जलद निर्णय हे महत्वाचे फायदे आहेत.
शुभंभवतु: दादा गाडेकर

## ३.२ लेख क्र. ३- अपघात आणि विवाहयोग एकाच वेळी ?

(ग्रहांकित एप्रील १९९९)

जातक बहुधा एकाच विषयाचा प्रश्न घेउन ज्योतिषाकडे येत असतो. गोचरी, विंशोत्तरी यांचे कालखड एकाच वेळी एका विषयासाठी अनुकूल तर दुसऱ्या विषयासाठी प्रतिकूल असू शकतात. इतर पध्दतीपेक्षा ग्राफिक मध्ये याचा अचूकतेने विचार होत असतो त्याचे हे उदाहरण आहे.

संदर्भ- दिनांक २/९/९८ रोजी सकाळी १० वाजता माझे मित्र दोन प्रश्न घेवून माझेकडे आले. सप्टेबर ९८ च्या सुरवातीस त्याचे मुलाचे बाबतीत किरकोळ आजारपण होते आणि त्या मुलाचा विवाह जुळविण्या बाबत हालचालीही सुरू होत्या असे दोन प्रकार होते. मुलाची जन्म तारीख २०/२/१९७०, वेळ १७:३५, फलटण, जि.सातारा अशी आहे.

**घटना**- या मुलाचे लग्नासाठी मुली पाहणेही चालू होते. त्यांना मी सप्टेंबर १९९८ पासूनचे मुलाचे १९ शारिरीक आणि ४ विवाह हे दोन ग्राफ काढून दिले. डिसेंबर १९९८ मध्ये ते पुन्हा माझ्याकडे आले आणि म्हणाले, डिसेंबर मधला कालावधी गेला, आता तुम्ही २३ जानेवारीचा दिला आहे त्याचे काय? त्याना मी दाखवले की लग्नाच्या ग्राफमध्ये चांगले शुभत्व होते पण याच मुदतीत तब्बेतीचा ग्राफ अशुभ आहे. गम्मत अशी झाली की मुलीकडील लोक मुलगा पहायला येण्याच्या आदल्या दिवशी मोटरसायकलचा अपघात झाला. गॉगलच्या काचांनी जखम झाल्यामुळे चेहऱ्यावर बॅंडेज बांधावे लागले होते आणि रात्री पहायला मुलीकडील मंडळी आली. बॅंडेजमध्येच चेहरा मुलीकडील लोकाना पसंत पडला व विवाह ठरला. एकाच कालखंडात एका विषयाची चांगली तर दुसऱ्या विषयाची अशुभ घटना ग्राफच्या सहायाने निर्णयासह अचूक दाखवली आहे.

**मार्गदर्शन** :- आजारपणाची पूर्व सूचना आमच्याकडून मिळाल्यामुळे मुलाला मानसिक ताण जाणवला नाही. विवाह करताना ४ आणि २१ च्या समान शुभ कालावधीत विवाह केल्यामुळे या जोडीला उत्तमप्रतीचे कौटुंबिक सौख्य लाभले आहे. इतर पध्दतीत करावयास सागितलेल्या कृतीचे सुख लाभण्याचा ध्येयवादच नसतो उलट आमच्या पध्दतीत सुख मिळण्याची शास्वती रहाते. भविष्य सांगण्याच्या ध्येयवादात सुखाची शाश्वती दुर्लक्षितच असते हा महत्वाचा फरक आहे .

## ३.३ लेख क्र. ११ - एकाच जीवनातील अचूकपण

(नक्षत्राचे देणे मे २००२)

माझ्या दृष्टीक्षेपांत काही 'जयंत' नांवाची मान्यवर आणि महत्वाची कारकीर्द असलेल्या व्यक्ती ऐकीवात आहेत. त्यांचा व्यक्तिविशिष्ट स्वभावाचा एक पैलू म्हणजे, त्यांनी ज्या विषयात रस घेतला त्या विषयासाठी ते लोक निश्चल असेच राहिले आहेत. त्यापैकीच आमचे जयंतरावजी साळगांवकर आहेत. सर्वश्री जयंतरावजी साळगांवकर या एकाच व्यक्तिच्या जीवनांत ज्या घटना घडल्या, त्यांच्या पुढील फळांचे स्वरूप त्या तारखेच्या ग्राफमधील शुभ- अशुभत्वाने अचूक दाखविले आहे.

संदर्भ- मा. श्री. श्री. भट यांचा ग्रहांकित फेब्रुवारी १९८९ मधील लेख. त्या घटनांचा परामर्ष या ठिकाणी ग्राफिकच्या सहाय्याने घेतला आहे.

नं. १) या अंकाच्या पान नं. ६ वर श्री. श्री. भट यांनी १२/३/५१ ही तारीख दिलेली आहे. त्याची पार्श्वभूमी : जयंतराव यांनी नाट्यप्रेमांत 'नवनाट्य मंदीर' ही संस्था स्थापन केली होती. त्यातील 'कुलदीपक' या स्वताच

लिहीलेल्या नाटकाचा पहिलावहिला नाट्यप्रयोग या दिवशी कसा-बसा झाला. परंतु पुढे त्यांच्या नाटकाचे विषय त्या काळांतीस रूढ विचाराशी संघर्ष निर्माण करणारे ठरले. हुंडाविरोधाबाबत जुन्या आणि नव्या पिढीचा विचार संघर्ष, नव्या पिढीच्या विचारांना मान्यता देणेचा विचार, ज्यातून जयवंतरावांना जीवनातून उठविण्याचे विरोधकांचे बंदुकीचे बार घराबाहेर होणे, अशारीतीचे वातावरण तयार झाले. हा गंभीर प्रसंग घडला ती तारीख २६/३/५१ होती. त्यादिवशी केवळ बाहेरच नव्हे तर घरातूनहि जबर विरोध या सर्वांना तोंड देण्याची पाळी या प्रयोगामुळे आली. ही घटना घडलेची तारीख (दिनांक १२/३/५१) ही ग्राफ विषय ३१ व्यवसाय मध्ये अशुभ आहे. पुढे ही नाटक कंपनी त्यांनी बाजूला ठेवली, बंद केली. विषयाची सुरूवात जर ग्राफप्रमाणे अशुभ असेल तर त्याघटनेचे भावी प्रत्यंतर दिनांक (२६/३/५१ दरम्यान) अशुभच असावयास हवे हा नियम तंतोतंत जुळलेला आहे.

२) पुढे जुलै मध्ये २६/७/५१ रोजी नाट्यव्यवसाय बाजूला ठेवून लोकसत्ता दैनिकामध्ये नोकरी सुरू केली. आपल्या नाट्यव्यवसायाचे नाटक झाल्यावर ही नवीन नोकरी उपजीवनार्थ मिळणे ही त्यांच्या दृष्टीने आनंदाचीच बाब असणार, नाही का? पण ग्रहस्थिती इतर कोणत्याही पद्धतीपेक्षा ग्राफने सहजतेने कळतेच शिवाय ते कळणे अचूक असते. ही नोकरी शुभत्वात असती तर दीर्घकाळ टिकली असती. या नोकरीचा त्याना लाभ केवळ पाच वर्षे लाभला. थोडक्यांत २६/७/५१ ही तारीख व्यवसायाचे ३१ नंबरचे ग्राफमध्ये अशुभ आहे. अशा वेळी त्या विषयात काही तरी कमतरता राहते. मिळालेली नोकरी दीर्घकाळ टिकली नाही. म्हणजे हे ग्राफचे अनुमान अचूक ठरले

१९५६ मध्ये त्यांनी लोकमित्र हे मासिक सुरू केले. त्याची तारीख दिलेली नसल्याने ती तपासता आली नाही.

<u>नोकरी लागेल की नाही या प्रश्नाच्या उत्तरा पेक्षा नोकरी लागून त्याचे पुढील स्वरूप कसे असेल हे सांगणे जातकाला जसे उपयोगी ठरते तसे भविष्य ठरत नाही</u>.

आता नं.१ मध्ये त्याच्या ध्येयाला तडे जाणाऱ्या घटनेचे पुढे काय परिणाम होणार आहेत हे ग्रहप्रभावाद्वारा पहाता येते का? तर येते. यासाठी नं. ३ आणि ४ या दोन ग्राफचा विषय येथे मांडलेला आहे.

नं. ३) १६/३/५१ ही 'कुलदीपक' नाटक सुरू केल्याची घटना आहे आणि २६/३/५१ रोजी गंभीर प्रसंग ओढवल्याची घटना आहे. त्यापैकी ३ - मानसिक ग्राफमध्ये पहिली घटना शुभ आहे. पुढेही ९/३ ते २३/३ पर्यंत कमी असले तरी शुभत्व आहे व त्यातच दुसरी तारीख आहे. यावरून कोणत्याही प्रसंगाला धाडसाने सामोरे जायचे सामर्थ्य आहे असा अर्थ निघतो. त्यांचे पुढील जीवनही असेच आहे. येथे अचूकता आणि ग्राफचे कौशल्य लक्षांत येते हे फार महत्वाचे.

<u>**संदेश -**</u> नोकरी व्यवसायांत तपासावयाची घटना परंतु त्याच घटनेवरून माणसाचे मानसिक धैर्य व मानसिक कार्यक्षमता पहाता येते. असे अनेक गुंतागुतीचे प्रकार शोधता येतात, जे इतरत्र अशक्य असते.

नं. ४) याठिकाणी दर्शविलेल्या २६ मार्च ५१ मधील घटनेसाठी ४२ मानसिक विकलता या विषयासाठी ग्राफ पूर्ण शुभत्व दर्शवीत आहे. यामुळे वरील मानसिक विकृतीच्या उलट समर्थतेला पुष्टीच मिळते. घटनेचे अनिष्ट परिणाम शोधण्यासाठी या विषयाची मी निवड केली होती. घटनेचे अनिष्ट परिणाम काही होणार नाहीत असे प्रारब्ध यातून नजरेस येते.

<u>**संदेश**</u> <u>''जे काही होते ते भल्याकरताच होते''. भले नेमके कशांत आहे हे सामान्य माणसाला कळत नाही. त्यासाठी ग्रहरचनेचा संकेत त्या ईश्वरी सत्तेने तयार करून ठेवलेला आहे. तो भविष्य सांगण्यासाठी नसून जीवाला त्याच्या जीवनांत मार्गदर्शन म्हणूनच आहे. त्यामुळे जीवनांत होणाऱ्या उलथापालथीसाठी ग्रहरचना ही कारण व्यवस्था नसून प्रारब्ध आणि ईश्वरी सत्ता आहे या विचारांना या पद्धतीतून पुष्टी मिळते</u>. पटले तर लक्षांत ठेवावे.

नं. ५) त्यांचा विवाह १.१२.१९५२ रोजी झाला. विवाह म्हणजे कौटुंबिक जीवनाची सुरवात म्हणून ती कौटुंबिक जीवनाची जन्मतारीख आहे हे या आधी मांडलेले आहे. ४ विवाह या ग्राफमध्ये ही विवाहाची तारीख शुभ आहे. याच कारणामुळे, म्हणजे प्रारब्धाच्या अनुकूलतेमुळे, मुलेबाळे, कौटुंबिक सौख्य आदि व्यवस्थित मिळालेले दिसते.

६) येथे २१ कौटुंबिक सौख्य या ग्राफमध्ये विवाहाची तारीख तपासली आहे. हा महत्वाचा ग्राफ आहे. विवाहासाठी हा वापरता येतो. विवाहात हा ग्रफ शुभ असणे चांगले असते. नवीन विवाह झाल्यानंतर कौटुंबिक सौख्याचा आरंभ शुभत्वांत असेल तर ते काटुंबिक जीवन सुखाचे जाणारच. परस्परातील मतभेद, वाद, तत्संबधीत घटना या ग्राफच्या सहाय्याने अचूक शोधता येतात. १ तारखेपासूनच हा ग्राफ शुभ असल्याने त्यावेळी कौटुंबिक सौख्य चांगले मिळेल.

नं. ७) येथे त्यांना मिळणारे प्रथम पुत्र प्राप्तीचे फल पहाणेसाठी १५ नंबरचा संतती सौख्याचा ग्राफ काढलेला आहे. अपेक्षेप्रमाणे या ग्राफमध्ये दिलेल्या मुलाच्या जन्मतारखेदिवशी म्हणजे दिनांक १५/११/५६ रोजी शुभत्वच आहे.

नं. ८) या ग्राफमध्ये त्यांच्या दुसऱ्या मुलाचा जन्म दिनांक १६/१/५९ रोजी झालेला आहे. ही तारीख देखील शुभत्वातच आहे हे वरील ग्राफवरून दिसून येत आहे. याच्या तिसऱ्या मुलाची तारीख तपासली परंतु ती अशुभत्व दर्शवीत आहे. ते का याचे कारण माहीत नाही.

नं. ९) हा व्यवसायाचा ३१ नंबरचा ग्राफ असून पूर्ण डिसेंबर ७२ चा महिना शुभ आहे. साळगांवकर यांनी त्यांची 'सुमंगल पब्लिकेशन कंपनी' सुरू केली तिची तारीख दिलेली नाही परंतु ७२ अखेरीस सुरू केली असे म्हटले आहे. जर डिसेंबर मध्ये सुरु केली असेल तर त्यावेळी ग्राफ शुभ होता हे फक्त पाहिले आहे.

अशारीतीने केवळ एका व्यक्तीच्या जीवनांत घडलेल्या महत्वाच्या घटना वरील आठ ग्राफच्या सहाय्याने तपासल्या असता त्या सर्व लेखकांनी दिलेल्या माहिती बरहुकूम तंतोतंत जुळलेल्या आहेत.

दादा गाडेकर, जीवनमार्गदर्शन, मु.पो. साखरवाडी, ता. फलटण जि. सातारा, ४१५५२२
मोबाइल ९४२३०३३६१९ / ०८७९६१६२६९१
शुभंभवतु

## ३.४ लेख क्र. १२- गाथा ग्राफची
(नक्षत्राचे देणे दिवाळी १९९९)

वरील अंकातील याच नावाचा मधु गडकरी यांचा लेख येथे ग्राफिकने विश्लेषण करण्यासाठी घेतला आहे. केपी बाबत मला कुतुहल आणि आदर निश्चित आहे. आणि याच नम्र जाणीवेतून हे लेखन प्रयोजन केले आहे. मार्च एप्रिल आणि जुलै ९९ चे ग्रहांकित' अंक पाहिल्यास अनेक घटना ग्राफिकच्या सहायाने तंतोतंत बरोबर जुळल्याचे निदर्शनास आणून दिलेले आहे.विशोत्तरी आणि गोचरी सतत बदलत असतात आणि त्यांच्या प्रभावामुळे ग्राफ हा नित्याने वर खाली होत असतो परंतु प्रत्येक वेळी घटना, प्रसंग घडेलच असे नाही. जीवनांतील इष्टानिष्ट घटनांचा मागोवा या ग्राफवरुन घेता येतो. ज्योतिषशास्त्राच्या अभ्यासूंना मी एक काहीसे शीघ्रपध्दतीचे नवीन दालन उघडून देत आहे. गोचरीचा अंतर्भाव केल्याशिवाय कालनिर्णय अचूक येवू शकत नाही आणि मानवी रीत्या ते अति अवघड आहे. परंतु या सर्व चुका सॉफ्टवेअरच्या माध्यमातून दुरूस्त केल्या जातात, म्हणून या शास्त्राचा अभ्यास नसलेल्या माणसालाही त्याचा उपयोग होतो.

लेखकाने दिलेल्या सदाशिव यांचा जन्म तपशील- २४.७.१९३८, वेळ- १९ ५०. यांच्या जीवनातील अनेक घटना ग्राफमध्ये पाहू या.

नं. १) विषय ३१ नोकरी- ११/६/५९ रोजी पहिली नोकरी लागली. ही नोकरी फारकाळ टिकली नाही. या दिवशी ३१ व्यवसाय हा ग्राफ अशुभत्वांत आहे. याचा अर्थ या वेंळी घटना जी घडली ती दीर्घ कालासाठी सुखावह असणार नाही असे बोधन करते. असा अचुक निर्णय ग्राफवरुन सहजतेने समजलेला आहे.

नं. २) विषय ४ - विवाह योग. ११/७/६२ रोजी या व्यक्तीचा विवाह झाला. या दिवशी ग्राफ शुभत्वात आहे. याचा अर्थ वैवाहिक जीवनात फार मोठ्या अडचणी नसतील. ग्राफचा निर्णय भावी काळाचा विचार करता सुसंगत आहे.

नं. ३) विषय ३१ - व्यवसाय. दुसरी नोकरी १/६/६४ रोजी लागली. या ठिकाणी ग्राफ शुभत्वात आहे परंतु मध्य रेषेच्या खाली असल्याने काहीसे अशुभत्व आहे. नोकरी कायमची होती पण शेवटी मोठ्या अडचणी येवून नुकसान झाले.

नं. ४) विषय १२ - १ स्वकमाईचे स्थावर इस्टेट घर या बाबत आहे. १/७/६५ या दरम्यान स्वत:चे घर झाले. ग्राफ येथे शुभत्व दर्शवितो. व्यक्तीचे स्वत:चे घर झाले. ग्राफचा निर्णय अचूक असल्याचे येथे दिसून येते.

नं.५) विषय ३१ - व्यवसाय नोकरी. त्यांना या नोकरीत तीन वर्षातच १.७.१९६७ रोजी ग्राफच्या शुभत्वात बढतीचा चान्स मिळाला. ही तारीख शुभत्वात आहे. ग्राफने दर्शविलेली दिशा योग्य आहे.

नं.६) विषय १५ - संतती. दिनांक ८/१/७० रोजी या व्यक्तीस चार मुलीनंतर पहिला मुलगा झाला, तो तीन दिवसच जगू शकला. येथे ग्राफ अशुभ आहे आणि या मुलाचे सुख अशुभत्वामुळे लाभले नाही. ग्राफ अचूक आहे.

नं. ७) विषय ३१ - नोकरी व्यवसाय. मार्च १९७२ मध्ये या व्यक्तीची ग्राफच्या शुभत्वात डेप्युटेशनवर बदली(बढती) झाली. पण २२ नोव्हेबर ७२ ची फेर बढती अशुभत्वात असल्याने पुढे खूप अडचणी दिसतात.

नं. ८) विषय ३१ - नोकरी व्यवसाय. दिनांक ६/११/७४ रोजी सेंट्रल एक्साईजच्या छाप्याचे अरिष्ट आले, पण ते टळले आहे. शुभत्व असल्यामुळे ते टळले असा याचा अर्थ निघतो, तो बरोबर आहे.

नं. ९) विषय २३ - बदली, स्थलांतर. या ठिकाणी दिनांक १८/१२/१९७५ रोजी बदली झाली. बदलीचा विषय ती हवी असेल तर योग्य आणि नको असल्यास अनिष्ठ समजला जातो. कारण मागे व पुढे ७७ च्या आणि ७५ च्या घटना दिल्यामुळे ही १९७५ ची घटना मध्येच कशी असा प्रश्न पडतो.

नं. १०) विषय ३९ - कायदेशीर अडचणी, कोर्ट कचेरी. ऑगष्ट १९७७ मध्ये यांचा कोर्टकेस चा प्रॉब्लेम होता. सविस्तर माहीत नसली तरी ही बाब अशुभत्वात धरावयास हरकत नाही. कारण त्याशिवाय कोर्टाचा संबंधच आला. नसता. कारण असल्याशिवाय कोर्टाची पायरी कोणी चढत नसते.

नं. ११) विषय ३१ - नोकरी व्यवसाय. २०/१२/७९ रोजी नोकरीतून बडतर्फीचे अशुभ फल यांना मिळालेले आहे. या ठिकाणी ऑगष्टमध्ये ग्राफने निर्णायक अशुभत्व दर्शविले आहे. ग्राफ अचूक आहे.

नं. १२) विषय - पत्नी सौख्य. या दिवाळी अंकाच्या ९५ पानावर कै. स. ह. गोखले स्पर्धा क्र. ९ पाहिल्यावर त्यावेळी ग्राफ पाहिला होता. ग्राफ फेब्रुवारी पासून ९/४/९८ पर्यंत अति अशुभ आहे आणि या अति अशुभ प्रभावातच ३ एप्रील रोजी मृत्यू झालेला आहे. ग्राफ हाच सशास्त्र असून वाचकांसाठी स्वतंत्र काही करावे लागत नाही.

घटनेचा निर्णय चांगला की वाईट पाहून त्याच आधाराने शास्त्राच्या इष्ट - अनिष्ट नियमातून हव्या त्या प्रकारच्या नियमांची निवड केल्याचे अनेक लेखात आढळते, ते चूक आहे. दादा गाडेकर

## ३.५ लेख क्र. ७९- लाखो रूपयाचे नुकसान वाचवून तेवढाच फायदा करून देणारे ग्राफिक.

खरोखरच समाजाचे लाखो रूपयाचे नुकसान वाचविणारी आणि त्याही पेक्षा जास्त रक्कमेचा समाजाला फायदा करून देउ शकणाऱ्या ग्राफिक पध्दतीचा विचार येथे माडलेला आहे. यात अतिशयोक्ती काहीही नसून हे सर्वकाही विज्ञान पध्दतीच्या शहानिशा पध्दतीने सिध्द केलेला भाग आहे. या पध्दतीतून आपण काय मिळवू शकतो याचा विचार मांडण्यापेक्षा आपण याच्या साहाय्याने समाजाला आपण काय देऊ शकतो हे काही उदाहरणांनी आपण पाहणार आहोत.

खालील उदाहरणात वापरलेले ग्राफिकचे विषय नंबर आणि विषयांची नांवे अशी आहेत:- ०४ - वैवाहिक सुख, १२.१ - पूर्वार्जित प्रॉपर्टी, १३ - वाहन, १५ - संतती सुख, १९ - तब्बेत, २१ - कौटुंबिक सौख्य, ३१ - व्यवसाय, ३२ - पितृसुख ३६ - आर्थिक, ३९ - कायदेशीर बाबी.

टीप:- (- ) वजा चिन्हासह दर्शविलेले नंबरचे ग्राफ/विषय अशुभ आणि +अधिक चिन्हासह दर्शविलेले ग्राफ नंबरचे विषय शुभ मानावेत.

**उदाहरण १ :-** यापूर्वी मी सलग आठ वेळा टेस्टट्यूब बेबीचा प्रयोग अयशस्वी झाल्याचे उदाहरण ६९ आणि ७५नंबरच्या लेखात दिले आहे. या सर्व तारखा २१ कौटुंबिक सुख आणि १५ संतती सुख या ग्राफमध्ये अशुभ असल्याचे ग्राफने अचूकपणे दाखविले, आणि त्या कारणाने ती संतती जगली नाही. ग्राफचा निर्णस सलग आठ वेळा योगायोगाने अचूक येणे सर्वस्वी अशक्य आहे, तर दुसरीकडे त्याचवेळी यावरून ग्राफिकची अचूकता आणि प्रारब्धनिष्ठता सिद्ध होते आहे हे आपण लक्षात घ्यावे. नंतर त्या स्त्रीला आठवा टेस्टट्यूब बेबीचा प्रयोग करायचाच होता, तो फेब्रुवारी २०१४ मधे आम्ही दिलेल्या २१ आणि १५ या दोन ग्राफच्या समान शुभत्वात करण्यात आला. ऑगस्टमध्ये आम्हाला कळवले होते की ''डॉक्टरांनी सांगितले आहे की जुळे असून माता आणि गर्भ दोन्हीही व्यवस्थित आहेत, संतती जन्म नोव्हेंबरमध्ये अपेक्षित आहे.''आमच्या दिलेल्या पध्दतीनुसार ग्राफच्या शुभत्वात कृति करून त्या स्त्रीला मुलाच्या सुखाचा लाभ झाला आहे.''

